# जगन्नाथ पण्डित

[ ऐतिहासिक कादंबरी ]

गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर

मूल्य अडीच रुपये

# प्र स्ता व ना

महाराष्ट्रास " स्थिति नो रे दध्याः " हे सुभाषित सुपरिचित आहे. लोकमान्य टिळकांनीं आपल्या केसरीच्या शीर्षभागीं त्याची योजना करून तें घरोघरीं नेऊन पोहोचविलें आहे.

आत्मसामर्थ्याच्या प्रतीतीनें ओतप्रोत होऊन कवि मदाने मत्त झालेल्या गजास सागत आहे, " रे गजराजा, आपला जीव घेऊन या क्षणीं येथून निघून जा. तूं निःशंक मनाने या वनात विहार करूं लागला आहेस खरा. पण पलीकडे त्या गुहेत कोण झोपला आहे, हे तुला ठाऊक आहे काय? काळ्याकुट्ट पाषाणखडास हीं हत्तीचीं गंडस्थळेच आहेत कीं काय अशा भ्रमाने आपल्या तीक्ष्ण नखांनीं विदारण करून किंचित् श्रमलेला हरिपति वनराज केसरी त्या गिरिगर्भात विसावला आहे ! "

तत्कालीन सर्व पण्डितमन्याच्या उरात धडकी भरेल, असे हें काव्य रचणारा पण्डितराज जगन्नाथ, यानें ज्या आत्मविश्वासाच्या प्रेरणेने हा श्लोक लिहिला, तो आत्मविश्वास यथार्थ होता, यात तिळमात्र शंका नाहीं.

कविकुलगुरु कालिदासाच्या नंतर एवढा प्रचण्ड आत्मविश्वास, तसेंच काव्यातलें अर्थसौंदर्य, लालित्य, प्रसाद, माधुरी, पाण्डित्य, तर्क, इत्यादि सर्व गुण एका जगन्नाथ पण्डिताच्याच काव्यात एकवटले आहेत. जगन्नाथाचे सर्व जीवन काव्यमय होतें. तो काव्यच जगला. त्याचे पाण्डित्य काव्यप्रचुर, विवाह काव्यमय, पुढील जीवन कवीला शोभेलसे आणि अवसानहि जणू एखादी अंतरास स्पर्श करून जाणारी कविता सपावी तसें. शब्दसपदा त्याच्यापुढे हात जोडून उभी आहे. मनात येतील ते अर्थ अभिव्यक्त करण्यास साजेसे शब्द त्याच्या भाडारात उपलब्ध आहेत. करुण, शान्त, शृगार, वीर आदि रसात त्याची प्रतिभा यथेच्छ विहार करते. जगन्नाथाचे काव्य वाचीत असता आपल्या तजेलदार शेपटीचें सुकाणूं करून एखाद्या जलाशयात लीलया विहार करणाऱ्या मत्स्यराजाचे स्मरण होतें.

पण अंतःकरणास मोहित करून क्षणभर ठाईंच उभे करणाऱ्या शृगार-करुणाच्या क्षेत्रातून जेव्हा कविराज जगन्नाथ बाहेर पडतो, आणि प्रति-

पक्षाचें अंगविच्छेदन करण्यासाठीं आपले नखानिशित शब्दबाण घेऊन वाग्युद्धास सज्ज होतो, तेव्हा भले भले अतिरथी–महारथी आपापलीं अस्त्रें टाकून, पळून जाण्यातच क्षेम आहे, हें जाणून दिसेनासे होतात. त्याचे शब्दलाघव मोठे मर्मस्पर्शी आहे. प्रतिपक्षीयाच्या व्यंगाचा भेद करून, त्याचें वास्तव रूप उघडे पाडून, त्यानीं पाघुरलेला बुरखा फाडून काढून, त्याच्याकडे उपेक्षेने पाहात निघून जाणाऱ्या जगन्नाथाचें प्रहारसामर्थ्य प्रचड आहे, यात सदेह नाहीं.

परतु जगन्नाथ अमर झाला, तो आपल्या केवळ काव्यगुणानींच नव्हे. काव्यगुणात जगन्नाथाशीं तुलना करता येईल, असे जयदेवासारखे कवि आपापल्या काव्यामुळें भारतीच्या गळयातले तन्माणि शोभत आहेत.

जगन्नाथाचें मोठेपण त्याने अलकारशास्त्रावर जो निरुपमेय ग्रथ लिहिला आहे, त्यामुळें विस्तार पावलें आहे. 'रसगगाधर' हा जगन्नाथाचा ग्रंथ जर संपूर्ण झाला असता, तर त्यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशाचे तेजहि उणें करून टाकलें असते. जगन्नाथाने आपली तर्कशक्ति, मूलगामी विचार-सामर्थ्य, शैली आणि प्रतिभा जणूं त्या ग्रथात पणास लाविलीं आहेत. रसगगाधर अपूर्ण रहावा, हें रसालकारशास्त्राचे दुर्दैवच म्हटले पाहिजे.

जगन्नाथाचा कालनिर्णय करणे हें काम मोठें अवघड होऊन बसलें आहे. आमच्या देशातील इतर अनेक ख्यातिप्राप्त पुरुषाप्रमाणेच जगन्नाथाच्या जीवनाचे बारीक तपशील सागणारा विश्वसनीय पुरावा उपलब्ध नाहीं. तशीं जगन्नाथास फारशीं वर्षे झालीं नाहींत. जरी तो अकबराच्या दरबारातला राजपण्डित होता, असाहि एक प्रवाद आहे, तरी तो मानण्यास सबळ अशीं प्रमाणे उपलब्ध नाहींत. अकबराच्या दरबारातील नवरत्नाच्या यादींत जगन्नाथाचे नाव नाहीं. त्याच्यासारखा पण्डितराज जर अकबराच्या पदरीं असता, तर त्याचा उल्लेख नवरत्नात न करण्याइतका अरसिक अकबर खासच नव्हता.

तेव्हा जगन्नाथ आणि शहाजहान हे समकालीन होते, हेंच गृहीत धरून चालणे अधिक इष्ट आहे. या विधानास उपोद्बलक प्रमाणेहि बरींच उपलब्ध आहेत.

संशोधकानीं त्या सर्व प्रमाणाचा निष्कर्ष काढून जगन्नाथाचा काल सतरावें शतक हा ठरविला आहे. सतराव्या शतकाच्या पूर्वार्धात हा अलौकिक तारा साहित्याकाशात कांहीं कालपर्यंत तेजस्वीपणे चमकला आणि तशाच तेजस्वीपणे लुप्त झाला.

जगन्नाथ हा मूळचा दाक्षिणात्य पण्डित. गोदावरी जिल्ह्यातील मुनुगुडु हें त्याचे जन्मस्थान. पित्याचे नाव पेरुभट्ट आणि आईचें लक्ष्मी. पेरुभट्ट हा प्रकाडपण्डित होता वेदान्त, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा, व्याकरण हीं शास्त्रे त्याला करतलामलकवत् होतीं. पेरुभट्टाजवळच जगन्नाथाचे बहुधा सर्व अध्ययन झाले. रसगगाधराच्या प्रस्तावात तो म्हणतो.

पाषाणादपि पीयूष स्यन्दते यस्य लीलया ।
त वन्दे पेरुभट्टाख्य लक्ष्मीकान्त महागुरुम् ॥

स्वतः पित्याने तयार केलेला हा युवा पण्डित उत्तराखण्डाची ओढ लागून एके दिवशीं उत्तरेत चालता झाला. जयपुरास त्याने एक पाठशाळा सुरू केली. पण राजपुतान्यासारख्या वैराण, शुष्क प्रातात अधिक कालपर्यंत त्याचे मन रमले नाहीं.

भारतीयाच्या गौरवाचें केन्द्रस्थान हस्तिनापुर–त्याच्या आकर्षणानें जगन्नाथास आकर्षित केले. तो दिल्लीस येऊन पोहोचला. शहाजहानचा दरबार गुणीजनाचे आश्रयस्थान होता. तिथे एका काजीशीं वाद करून जगन्नाथाने त्यास पराभूत केले दिल्लीश्वराच्या दरबारात प्रवेश मिळावा, या हेतूनें जगन्नाथाने फारशी भाषेतहि नैपुण्य मिळविले होते.

काहीच्या मतें जगन्नाथाचा काजीशीं झालेला वाद जयपुरींच झाला. त्यामुळे त्याची जी कीर्ति पसरली, ती ऐकून शहाजहानने त्याला आपल्या दरबारीं बोलावून घेतले.

कांहीं का असेना, शहाजहान जगन्नाथाच्या पाण्डित्याने प्रभावित झाला, आणि त्याने त्याला राजपण्डित ही उपाधि देऊन सन्मानिले.

शहाजहानच्या एका यवनी मानसकन्येचें–लवगीचें–जगन्नाथावर प्रेम बसलें. जगन्नाथहि तिच्याकडे आकृष्ट झाला. त्यानें शहाजहानजवळ लवगीची मागणी घातली. शहाजहानने तिला त्याचे हातीं सोंपविलें. हें युवा-

अनुरक्त दांपत्य विवाहबद्ध होऊन मोठ्या आनदानें आपला काल व्यतीत करू लागले.

अकबराचे वेळीं अनेक हिन्दु स्त्रियानीं मुसलमानाशीं लग्नें केलीं. पण ऐन दिल्लींत बादशहाच्या सम्मतीनें एका यवनीशीं विवाह करून धर्मत्याग न केलेला जगन्नाथ हाच पहिला प्रसिद्ध पुरुष.

या विवाहामुळें जगन्नाथाची धडाडी, साहस, रूढीस न जुमानतां काहींतरी अलौकिक, जगावेगळें करण्याची प्रवृत्ति हे सर्व गुण कसास लागले. जगन्नाथ या परीक्षेत पूर्णपणें उतरला.

शहाजहानचा थोरला पुत्र दारा व जगन्नाथ या दोघाचा परमस्नेह होता. दाराशुकोह हा उदार मनाचा, परमतसहिष्णु, गभीर प्रकृतीचा होता. त्यानें कुराणाबरोबरच हिन्दूचे स्मृति आदि ग्रथ, उपनिषदे आणि ख्रिश्चनाचें बायबल याचेहि अध्ययन केलें होतें. रूढीविरुद्ध बंड करणारा जगन्नाथ आणि दाराशुकोह या दोघाचा स्नेह दिवसेदिवस वृद्धिगत होत गेला.

मुमताजमहलचा भाऊ असफखान, याकडे काश्मीरचा सुभा सोंपविला होता. विवाहोत्तर जगन्नाथ शहाजहानबरोबर काश्मीरमध्ये गेला. असफखानाच्या गुणग्राहकतेवर लुब्ध होऊन जगन्नाथाने त्याच्या जीवनावर असफविलास हा ग्रथ लिहिला. पुढें शहाजहानास औरगजेबानें आग्रा मुक्कामीं कैद केले, आणि जगन्नाथाचे ग्रह फिरले. लवंगीसह त्याला दिल्ली सोडावी लागली. असे म्हणतात, कीं लवगीला त्याच्यापासून एक मुलगा झाला होता. तोहि या धामधुमींत गमावला. या शोकामुळे असो किंवा प्रवासाचे कष्ट सहन न झाल्यामुळे असो, लवगीचेहि देहावसान झालें.

परमशोकाकुल झालेला जगन्नाथ काशीस पोहोंचला. त्यानें रूढीविरुद्ध केलेले बंड तत्कालीन समाजास मुळींच आवडले नव्हते. काशींतील अप्पय्या दीक्षित प्रभृति ब्राह्मणानीं त्यास विश्वेश्वराचे दर्शन घेण्यास मज्जाव केला. ब्राह्मणानीं केलेल्या छळामुळे चवताळून जगन्नाथानें चित्रमिमासाखण्डन आणि मनोरमाकुचमर्दन हे अनुक्रमें अप्पय्या आणि भट्टोजी दीक्षितांच्या ग्रंथाचे खण्डन करणारे ग्रंथ लिहिले.

ब्राह्मणाचा छळ जेव्हा सीमा ओलांडून पलीकडे गेला, तेव्हा हताश होऊन जगन्नाथ गंगेच्या तीरावर जाऊन पोहोचला. तिथे त्याने आपल्या सुप्रसिद्ध काव्याची, गंगालहरीची रचना करावयास प्रारंभ केला. बावन्न श्लोकाच्या गंगालहरींपैकीं जसजशी एकेका श्लोकाची रचना होऊं लागली, तसतसे गंगेचें पाणीहि वर चढत चालले. असें म्हणतात, कीं बावन्नावा श्लोक पूर्ण होताच गंगा या आपल्या हताश झालेल्या प्रिय पुत्रास आपणाबरोबर घेऊन गेली. काहींच्या मतें गंगालहरीच्या समाप्ती-नंतर जगन्नाथाने गंगेत आत्मसमर्पण केले.

लवंगी या क्षणापर्यंत जगन्नाथाबरोबर होती, आणि तिनें त्याच्यासवेच गंगेंत देह समर्पित केला, असाहि समज आहे. पण अन्तर्गत प्रमाणें या समजाच्या विरुद्ध आहेत. गंगालहरींत जगन्नाथाने आपणास एकट्यासच उद्धरण्याविषयीं गंगेची प्रार्थना केली आहे आणि भामिनीविलास या ग्रंथातील करुणविलासात जगन्नाथाने पत्नीविरहाची जी गाथा गाइली आहे, तिच्यातील आर्तता पाहता त्याला अगोदरच पत्नीवियोग झाला असावा, हा समज दृढ होतो.

एकूण जगन्नाथाचे जीवनच अलौकिक होतें. अत्यंत श्रेष्ठ बुद्धिमत्ता आणि धारणाशक्ति अंगीं असणाऱ्या या तेजस्वी कवीवर जर समाजानें केलेल्या छळामुळें गंगेंत आत्मसमर्पण करण्याची पाळी न येती, तर रसालंकारशास्त्र निश्चितच अधिक संपन्न, प्रगल्भ, प्रौढ झाले असतें. तरी पण आज अपूर्ण स्वरूपात असलेला रसगंगाधर आणि जगन्नाथाच्या ज्या इतर रचना उपलब्ध आहेत, तेवढ्यानींच साहित्याचा गौरव निःसशय वाढला आहे.

जगन्नाथाच्या नावाने खालील ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**रसगंगाधर**—अप्रस्तुत प्रशंसा, उल्लेख, विभावना, उपमा, अति-शयोक्ति, प्रतीप, सम, परिसंख्या इत्यादि अलंकाराची समग्र चर्चा करून स्वतःचींच उदाहरणे देऊन, नाना वृत्ताचा विस्तार करून, नवरसाची व्याख्या करून जगन्नाथानें सम्पूर्ण अलंकारशास्त्र विद्यार्थ्यांच्या समोर उप-

लवून दाखविण्याचा चंग बांधला होता. दुर्दैवानें त्याची ती मनीषा अर्धवट राहिली.

अलङ्कारादिकांची व्याख्या करताना जेव्हा उदाहरणाची आवश्यकता भासली, तेव्हा जगन्नाथ म्हणतो,

निर्माय नूतनमुदाहरणानुरूपं
काव्यं मयात्र निहितं न परस्य किंचित् ।

दुसऱ्या कुणाच्याहि काव्यास मी स्पर्श करणार नाहीं, ही जगन्नाथाची प्रतिज्ञा अगदीं यथार्थ आहे. त्याने प्रत्येक उदाहरण नवीन, स्वयंनिर्मित, असेंच समोर मांडलें आहे.

विद्यार्थ्यांनीं अलंकारशास्त्रावरील या श्रेष्ठ ग्रंथाचें समालोचन करणें आवश्यक आहे. नुकताच प्रा. आठवले यांनीं केलेला रसगंगाधराचा अनुवाद प्रसिद्ध झाला आहे, तो या दृष्टीनें अभ्यसनीय आहे.

**भामिनीविलास**—प्रास्ताविक, शृंगार, करुण व शान्त अशा चार विलासांत विभागणी केलेला जगन्नाथाचा हा ग्रंथ सरस्वतीचें एक भूषणच आहे. जगन्नाथाची प्रतिभा किती सर्वस्पर्शिनी, हळुवार, बारीक बारीक गोष्टी वेंचून त्यांचा आविष्कार करणारी आहे; हें भामिनीविलास सहज चाळला असताहि कळून येण्यासारखें आहे. कोणत्याहि रसाचा आविष्कार करताना जगन्नाथ अगदीं तन्मय होऊन जातो. त्याचें स्वतंत्र अस्तित्व वेगळें कुठें दिसत नाहीं. एकेका श्लोकाचा विचार करता करता प्रहरच्या प्रहर लोटून जावेत, अशी भामिनीविलासाची योग्यता आहे.

**गंगालहरी**—जनसामान्यांत जगन्नाथ प्रसिद्ध आहे, तो त्याच्या गंगालहरीमुळें. अतिमधुर, करुणरसानें ओतप्रोत, असें हें बावन्न श्लोकांचे काव्य अनेकांच्या पठनांत आहे. या श्लोकांनीं गंगेची स्तुति करून शेवटीं जगन्नाथानें गंगेंत आत्मसमर्पण केलें.

**सुधालहरी, लक्ष्मीलहरी, करुणालहरी, अमृतलहरी** आदि स्तोत्रें अनुक्रमें सूर्य, लक्ष्मी, विष्णु आणि यमुना यांची स्तुति करणारीं आहेत. यमुनावर्णन नांवाचा एक गद्यप्रबंधहि जगन्नाथाच्या नांवानें प्रसिद्ध आहे.

**असफविलास**—या नावाचा असफखानावर लिहिलेला ग्रंथ आज संपूर्णरूपात कुठेंहि उपलब्ध नाहीं.

**प्राणाभरण**—ही ५३ श्लोकाची चूर्णिका कामरूपाचा राजा प्राणनारायण याची कीर्ति वर्णन करणारी आहे, तसेच **जगदाभरण** हा ग्रंथ उदेपुराधिप राणा जगत्सिंहाचें वर्णन करणारा आहे. काहीं विद्वानाच्या मतें हा ग्रथ दाराशुकोहची प्रशसा करण्यासाठीं लिहिला गेला असावा.

**चित्रमीमांसाखंडण** आणि **मनोरमाकुचमर्दन** या दोन ग्रंथाचा उल्लेख पूर्वीं येऊन गेलेला आहे.

अशा पण्डितराज आणि राजतिलक या पदव्यानीं यथार्थपणें सुशोभित असणाऱ्या जगन्नाथ पण्डिताचें जीवन मीं कादबरीरूपानें रसिकासमोर माडले आहे.

कादंबरी लिहीत असता निव्वळ इतिहासाचाच आश्रय न करता कल्पिताचेंहि साहाय्य घ्यावें लागते मींहि आवश्यक तिथें कल्पनेचा आश्रय केला आहे.

ही कादंबरी वाचून अभ्यासूचे मनात जगन्नाथाच्या ग्रंथाचें पठन करण्याची बुद्धि निर्माण व्हावी हा माझा हेतु आहे. सर्वेश तो हेतु सफल करो.

तळेगाव दाभाडे,
जि. पुणे

**गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर**



ज्येष्ठ भ्रातृसदृश

पं. महादेवशास्त्री जोशी

यांस

सादर समर्पित

गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर



# . १ .

दुर्गाबा आपले भुरुभुरु उडणारे केस कसेतरी सावरीत धांवत धावत बाहेर आली खरी, पण तिचा थोरला भाऊ जें काय करीत होता, तें पाहून मात्र ती कुडाच्या भितीला टेकून त्याच्याकडे आश्चर्यानें पहात उभी राहिली. तिच्या लहानग्या शरिरातलें इवलेसें मन जिज्ञासेने भरून गेलें. अम्मा त्याला बोलावीत आहे ही गोष्टहि तिच्या स्मरणातून गेली.

समोर सुडाच्या कागदावर मोठ्या श्रमानीं लिहिलेल्या पोथ्याचा भला मोठा ढिगारा रचलेला असून जगन्नाथ अनन्य मनानें एका कागदावर हातींच्या बोरूने काहीं तरी काढण्यात मग्न झाला होता. दुर्गाबेला त्या गमतीचे कौतुक तर वाटलेंच, पण त्याहीपेक्षा अधिक आश्चर्य तिला वाटले, तें त्याच्या कपाळाकडे बघून.

त्यानें आडवे भस्म लावलें होतें, आणि शिवाय त्याच्या मधोमधच वैष्णवाचा उभा नामहि ठोकून दिला होता !

दोन तीन क्षणानंतर ती आश्चर्याच्या त्या महापुरातून बाहेर पडली आणि नतर मोठमोठ्यानें हंसू लागली. समाधिमग्न जगन्नाथानें चमकून वर पाहिलें. समोर दुर्गाबा दिसताच हातचा बोरू खालीं साडीत तो आळस देऊन म्हणाला,

" दुर्गे ! हंसत्येस काय ? "

दुर्गाबा टाळ्या वाजवीत म्हणाली,

" एकाच्या कपाळावर काऽवळा ! आम्ही जातों देऽवळा ! "

जगन्नाथानें अगोदर कपाळास हात लावून पाहिलें. पण जेव्हा त्याला त्यावर कावळा बसलेला आढळला नाहीं, तेव्हा मग त्यानें शेजारीं पडलेला पोलादी दर्पण उचलला. त्यात आपलें प्रतिबिंब पाहूनहि त्याला दुर्गाबा का हंसते, तें कळेना.

" कुठें आहे ग कावळा ? खोटी कुठली ! "

" कावळा नाहीं तर काय ? कावळा कसा असतो ? "

" काळा ! "

" बघ बर तुझ्या कपाळावर काळा कावळा आहे कीं नाहीं ? "

पुन: दर्पणात पाहून जगन्नाथ गदगदा हंसला आणि म्हणाला,

" वेडये ! तो कावळा नाहीं ! नाम आहे तो ! वैष्णवाचें चिन्ह ! "

" अन् मग भस्म कशाला लावलें आहेस ? "

क्षणभर जगन्नाथ विमनस्क झाला. दुसऱ्या क्षणीं प्रसन्नपणें हंसून तो म्हणाला,

" दुर्गे, तें तुलाच कळले तर कळेल. विष्णूचा रग कसा आहे ? "

" निळा. "

" तो निळा का झाला सागशील ? "

दुर्गाबा बोलत नाहीं, हें पाहून जगन्नाथ म्हणाला,

" ऐक दुर्गे ! शंकरानें विष प्राशन केलें. त्याचा परिणाम विष्णूवर होऊन तो निळा झाला. "

" हात्तिच्या ! हें तर सोपें आहे रे दादा ! "

" होय दुर्गे ! म्हणूनच तें कोणाला कळत नाहीं. आणखी ऐक, विष्णूनें अमृत प्राशन केलें. अमृताचा वर्ण दुधासारखा पाढरा स्वच्छ आहे. म्हणूनच शकर कर्पूरगौर आहेत ! समजले ? "

टाळ्या वाजवीत दुर्गाबा म्हणाली,

" समजले ! समजलें ! पण दादा, हें तुला कुणीं सागितले ? "

कुठेतरी पहात जगन्नाथ म्हणाला,

" कुणीं सागितलें ! कुणीं नाहीं सागितलें. हें माझे मलाच कळले. "

....३....

एवढी छान गम्मत ज्या आपल्या भावाला कुणीं न सांगता कळली, त्याच्याविषयीं दुर्गोबेला वाटत असलेला आदर शतगुणित झाला. त्याच्या गळ्यात पडून त्याच्या गालावर आपलें नाक घाशीत ती म्हणाली,

" अन् दादा ! हें चित्र कसलं काढीत आहेस ? "

" कुठे आहे चित्र ? "

" तें काय कागदावर ? "

हंसून तिचा मुका घेत जगन्नाथ म्हणाला,

" तें चित्र नाहीं दुर्गे ! "

" मग ? "

" तें चित्रकाव्य आहे ! "

" चित्रकाव्य ! "

" होय. हे बघ. हा संहितेतला एक मंत्र आहे. 'जनासो अग्नि दधिरे सहोवृध विधेम ते ।' याची मीं चित्रबद्ध रचना केली आहे—"

" दुर्गे—ए दुर्गे ! " आतून हाका ऐकू आल्या, आणि त्याच्या पाठोपाठ अम्माहि येऊन दारात उभी राहिली. केवळ एक गाठ मारलेला आपला विपुल केशभार पाठीवर टाकीत ती म्हणाली,

" अय्यो ! दुर्गे, मीं तुला जगन्नाथाला हाक मारायला सांगितली ! तें विसरून ही पोर त्याच्या गळ्यात पडून गोष्टी बोलत बसली ! "

" अम्मा ! हें बघ दादानें काय केलें आहे तें ! कसलें काव्य—"

" असूं दे ! तुझ्या दादाला नाहीं उद्योग ! तो घरात वावरूनहि कधीं घरात नसतो. त्याचे जग वेगळें आहे. एवढी मीं म्हातारी झाल्यें, पण मला कधीं कुणाच्या डोळ्यांच्या जागीं मोत्याचे शिंपले दिसले नाहींत, की कमळे दिसलीं नाहींत ! नाकाच्या जागीं मला कधीं चंपककलिकेचाहि भास झाला नाहीं ! पण या तुझ्या दादाचे सगळेंच मुलुखावेगळें ! "

हंसून तिच्याकडे पहात जगन्नाथ म्हणाला,

" अशी रागावल्येस काय अम्मा ! "

हातावर गाल टेकून आश्चर्यानें बघत अम्मा म्हणाली,

" ऐका याचे ! म्हणे रागावतेस का ! एवढा मोठा मुलगा झाला !

लोकाचीं मुलें बघ ! त्याना दोनदोन लेंकरें होऊन तीं प्रपंचाला लागलीं ! अन् याला अजून मूठभर तादूळ कुठून मिळवून आणणें जमत नाहीं ! सदा न् कदा कमल, अम्बुज, मेघमाला, सुरनदी, ताल, तमाल, गिरिशृंग, चारुमुखी, मृगनयना, भ्रमरतती, गुजारव याच्या संगतींत मग्न असतो हा ! आमच्या या द्रविड देशातल्या स्त्रियासुद्धा याला कर्पूरगौरा दिसतात !"

खदाखदा हंसत आणि दुर्गाबेला कडेवर घेऊन गिरक्या मारीत जगन्नाथ म्हणाला,

"अम्मा ! विश्वाच्या या कुरूपतेंत सौंदर्य पहायचा हा गुण मला कुठून मिळाला माहीत आहे ?"

"कुठून बाबा ?"

"तुझ्यापासून !"

"पुरे झाले रे तुझे ! आता मी काय जन्मभर पुरायची आहें तुला ?"

"याच जन्मीं नव्हे, जन्मोजन्मीं !"

"ऐका याचें ! तें काहीं नाहीं चालायचें तुझें ! आता लग्न करून टाक !"

"कुणाचे ? दुर्गीचें ना ? हो ! बाबाच्या पाठशाळेंत तो एक बोचरा, पिट्टुकल्या डोळ्याचा म्हातारा येतो, त्याच्याबरोबर–!"

"पुरे रे ! आज इतके दिवस शारदाम्बा माझ्या मागें लागली आहे. सोन्यासारखी तिची पोर, केवळ तुझ्यावर विसंबून आतापर्यंत त्या बिचारीनें पोरीचे लगीन लाबवलेंन्–"

जगन्नाथ एकदम गंभीर झाला. तो म्हणाला,

"अम्मा ! माझ्यासाठीं वाट पहा, असें मीं तर सागितलें नाहीं त्याना !"

"तूं का सागायचेस ? अरे, तसें पाहिले तर तुला कान धरून लग्नाला उभें केले असतें केव्हाच ! पण करता काय ! एकटा मुलगा ! म्हणून इतके दिवस वाट पाहिली ! म्हटलें, तुझ्या छंदानें होऊं द्या ! अध्ययन झालें, सगळ्या पंचक्रोशीभर पंडित म्हणून प्रशंसा झाली ! तुझ्या कविता-शक्तीचे आचार्य शेषवीरेश्वरानीं कौतुकहि केलें ! आता मुकाट्याने लग्नाला उभा रहा, अन् प्रपंचाला लाग इतर चार पोरासारखा !"

" अम्मा ! तुझी इच्छाच असेल, तर मी लग्नवेदीवर उभा राहीनहि. पण त्या मुलीला केवळ तुझ्यासारखी मायाळू सासूच काय ती मिळेल ! यापलीकडे तिच्या हातीं काहीं लागायचें नाहीं ! "

" कां ? " आश्चर्यानें स्तंभित होऊन अम्मानें विचारलें.

" एवढ्या लहान मुलीला घेऊन मी देशपर्यटनाला जाऊं शकणार नाहीं !"

" देशपर्यटनाला ? "

" होय अम्मा ! एवढे दिवस मी बोललों नाहीं. पण मी लवकरच प्रवासाला बाहेर निघणार आहें ! "

" आणि परत केव्हा येशील ? " श्वास रोधून अम्मा म्हणाली.

" तें मी कसें सांगूं अम्मा ! मला या देशाचें सौंदर्य प्रत्यक्ष अवलोकन करायचें आहे. क्षितिजापर्यंत दृष्टि जाऊनहि ज्या मैदानाचा अंत होत नाहीं, त्यांतून आपली असीम, शीतस्पर्शवती जलधारा दुथडी वाहविणारी पयस्विनी गंगा मला पहायची आहे. धवल हिमवर्षावानें गौराग झालेलीं हिमालयाचीं गिरिशृंगें मला पहायचीं आहेत ! त्या हिमशिखरावरील नीलाकाशांत आपले भले मोठाले पंख पसरून स्वच्छंदानें विहार करणाऱ्या राजहंसांच्या पंक्ती मला बघायच्या आहेत ! कविकुलगुरूच्या दूतांकित मेघाचा मार्ग मला प्रत्यक्ष हिंडून अवलोकायचा आहे ! ज्या मार्गानें त्या कवींच्या कवीलाहि मोह घालून रसवंती वाणीनें आपलें वर्णन करायला प्रवृत्त केलें, त्या मार्गाचें सौंदर्य मला धुंडाळून काढायचें आहे ! आणखी—

" आणखी पुष्कळच आहे अम्मा ! हें सगळें पाहून मी कधीं परतेन तें मी आजच कसें सांगूं ? "

आवेग आवरून अम्मा म्हणाली,

" तूं कधींच परत येणार नाहींस काय ? "

" असें का विचारतेस अम्मा ? मीहि याच भूमीचा पुत्र नाहीं काय ? भाताच्या लोंब्यांनीं लवलवणारीं शेतें, सह्याद्रि पर्वतापासून येथवर वहात येऊन हा देश सुजल सुफल करणाऱ्या नद्या, या देशाचे बैल, शेतकरी, येथील निळें आकाश, पक्षी या सर्वांवरच माझें प्रेम आहे. अम्मा, तुझ्याविषयींचा माझ्या मनांतला आदरभाव काय वर्णन करूं ? बाबा, त्याची

पाठशाळा, तीमधील विद्यार्थी, आपलें हें गाव, गोदावरी नदी, तिचा घाट, रोज पाण्याचे घट डोईवर घेऊन गजगतीनें त्याच्या पायऱ्या चढणाऱ्या स्त्रिया, हें सगळें चित्र माझ्या नित्यपूजेची वस्तु होऊन बसलें आहे. मी या सर्वांची नितराम् भक्ति करतों.

" पण अम्मा ! माझी भूक अधिक प्रज्वलित होऊं पहात आहे ! ती विश्वव्यापिनी होऊन ब्रह्मांडाचा घास घेऊं म्हणत आहे. या सर्व विश्वातील सौंदर्य पिऊन जाईल, एवढी माझी तृषा भडकली आहे !

" तेव्हा आताच विवाहवेदीवर माझा बलि देऊन त्या माझ्या जिज्ञासेच्या पटावर पूर्णविराम लिहूं नकोस अम्मा ! मला हें सगळें पाहूं दे ! या सगळ्या दृश्याचा अपरोक्ष साक्षात्कार करून घेऊं दे !

" तोंपर्यंत तुझ्या शारदाम्बेला थांबायपुरता धीर असेल, तर मग मी तिच्या मुलीशीं विवाहबद्ध होईन. नाहींपेक्षा —"

" म्हणजे मी माझा शब्द खोटा पडूं देऊं, असेंच ना ? "

जगन्नाथ काहीं बोलला नाहीं. त्याच्या कडेवर बसलेल्या दुर्गाम्बेच्या केसात बोटें फिरवीत तो उभा राहिला.

पदरानें डोळे टिपीत घसा साफ करून अम्मा म्हणाली,

" मी याच्या लहानपणापासून याना म्हणत होत्यें, कीं याला अधिक शिकवूं नका ! याचीं लक्षणे मला धड दिसत नाहींत. पण सोसासोसानें यानीं याच्याकडून न्याय, व्याकरण, पंचमहाकाव्यें, अन् भरीला भर म्हणून वेदान्त म्हणविला ! आतां भोगा म्हणावें त्याचीं फळें ! "

समोर नसलेल्या "या"च्याकडे एक क्रोधकटाक्ष टाकीत अम्मा आत गेली.

आज दिवसभर श्रीरंगवेल्लीस हवन असल्यामुळे पेरुभट्ट तिकडे गेले होते, ते उद्या परत येणार होते. त्यामुळें आपला आवेग प्रकट करायला दुसरें साधन नसल्यानें अम्मा दिवसभर धुमसत राहिली.

दुर्गाम्बा नेहमींप्रमाणें सायंकाळीं तिच्याजवळ खाऊ मागण्यास गेली असता अम्मानें तिला धुडकावून लावलें. दुर्गाम्बा इवलेंसें तोंड घेऊन बाहेर आली.

तिला सकाळपासून दादाचाहि रागच आला होता. नाहीं तर काय ! अगदीं शेतें, नद्या, पाण्याचे घडे डोक्यावर घेऊन मिरविणाऱ्या काळ्या

दुस्स बाया आणि बैलसुद्धा त्याला आवडतात म्हणे ! आणि तिचें त्यानें नावहि घेतलें नाहीं !

जगन्नाथहि आज दिवसभर हारपल्यासारखा काहींतरीच करीत होता. व्याकरण शिकणाऱ्या विद्यार्थ्याला आज त्यानें काव्यशास्त्राचा पाठ सागितला, आणि न्यायशास्त्राच्या विद्यार्थ्यांकडून रामो हरिः म्हणवून घेतलें. विद्यार्थी आपापल्या पोथ्या गुंडाळून मुकाट्यानें उठून गेले, तरी तो काहीं बोलला नाहीं.

सायंकाळीं तो देवदर्शनासाठीं घराबाहेर पडणार, तों त्याला अंगणातील कठड्याच्या दाराशीं आपल्या मोठाल्या डोळ्यांनीं त्याच्याकडे रोखून पहात उभी असलेली दुर्गाम्बा दिसली. तेव्हा कुठे तो भानावर आला, आणि त्यानें हाक मारली,

" दुर्गे ! "

एक क्षणभर त्याच्याकडे टवकारून पाहून लगेच दुर्गेने आपलें तोंड वळविलें. वोळून आलेल्या मेघाप्रमाणे तिचे डोळे पाझरूं लागले. कळवळून जगन्नाथ तिच्याजवळ गेला, आणि तिला उचलायचा प्रयत्न करीत तो म्हणाला,

" अकालीं पर्जन्यवृष्टि का सुरू झाली ? "

त्याला दूर लोटीत दुर्गाम्बा म्हणाली,

" आम्ही नाहीं जा ! "

" तुम्ही आहातच ! अगदीं आमच्या कुशींत बसल्या आहात ? " तिला बळेंबळें उचलून घेऊन जगन्नाथ हंसत म्हणाला.

" तुला इथल्या बाया अन् बैल आवडतात ना ? " गाल फुगवून त्याच्याकडे न पाहता दुर्गाम्बा म्हणाली.

" कोण म्हणतो ? "

" तूच तर म्हणत होतास सकाळीं अम्माला ? "

" असं असं ! बरं मग ? "

" त्या बायाना आणि बैलाना उचलून घे तर ! आम्हाला कशाला घेतोस ? आमचं नाव तरी घेतलस का सकाळीं ! "

आतां कुठें जगन्नाथाला तिच्या रागाचें कारण कळलें. खो खो हंसत तो म्हणाला,

" ओहो ! एकूण म्हणून रागावली आहे तर दुर्गाराणी ! हात्तिच्या ! ऐकशील का दुर्गे ? "

" आम्हाला नको सांगूंस ! "

" ऐक तर खरें ! ज्याच्यावर फार प्रेम असतें ना, त्याचें नांव घ्यायचें नसतें. "

' खरेंच ? "

" मी खोटें का सांगेन ? मला वीरभद्रेश्वर फार आवडतो. मी रोज त्याच्या दर्शनाला जातों. खरें कीं नाहीं ? "

" होय ! "

" मग त्याचें नाव घेतलें का मीं ? "

" नाहीं. "

" मग तुझें कसें घेईन ? तूं मला फार आवडतेस ! वीरभद्रेश्वरा-एवढी ! "

आतां कुठें दुर्गाम्बेचें समाधान झाले. ती जगन्नाथाकडे पाहून खुदकन् हंसली. तिच्या गालांवरील आसवाच्या ओघळांवर आपले ओठ टेकीत जगन्नाथ म्हणाला,

" आतां झालें ना समाधान ? चला आता देवदर्शनाला. "

त्याच्या कुशींत बसून जात असता त्याच्या डोक्यावरील भल्या थोरल्या शेंडीच्या गांठीशीं खेळत दुर्गाम्बा म्हणाली,

" दादा, तूं गंगा पहायला जाशील, तेव्हां मला नेशील बरोबर ? मलाहि गंगा आवडते. वाल्मीकिकृत गंगास्तोत्र अम्मानें माझ्याकडूनहि पाठ करवून घेतलें आहे. "

" खरे ? "

" हो ! म्हणून दाखवूं ? मातः शैलसुता सपत्निवसुधा—"

" पुरे पुरे ! तूं पण्डिता आहेस ! "

" मग नेशील ? "

जगन्नाथानें हंसत तिची पाठ थोपटली. तें संमतीचें लक्षण मानून ती म्हणाली,

" गंगा खूप मोठी आहे का रे ? "

" हो ! "

" केवढी मोठी ? "

" खूप मोठी ! "

आपले दोन्ही हात विस्तारून दुर्गाम्बा म्हणाली,

" एवढी ? "

हंसून जगन्नाथ म्हणाला,

" होय. तेवढी. "

मग ती संध्याकाळ दुर्गाम्बेनें गंगेच्या आणि हिमालयाच्या गोष्टी बोलण्यांत घालविली. रात्रींहि तिनें त्याच्या कुशींत झोंपून हिमालया-विषयीं त्याच्याशीं वाद घातला.

" हिमालय देवता आहे ना रे ? "

" नाहीं. पर्वत आहे तो. "

" ऊंहूं ! देवता आहे. "

" कशावरून ? "

" कालिदासाचा श्लोक नाहीं का ? देवतात्मा हिमालयो नाम—"

" हो हो ! विसरलों होतों मी. "

रात्रभर दुर्गाम्बेला हिमालयाचीं स्वप्नें पडत होतीं. पण जगन्नाथ आणि अम्मा, दोघेहि आपापल्या अंथरुणावर तळमळत होतीं.

दुसरे दिवशीं सकाळीं पेरुभट्ट मोठ्या संतुष्ट मनानें घरीं परतले.

त्यानीं आपले श्मश्रु केलेलें मस्तक आणि भव्य भालप्रदेश अंगावरील उत्तरीयाने पुशीत माजघरात प्रवेश केला, तों हर्षनिर्भर दुर्गाम्बा त्याना सामोरी येऊन म्हणाली,

" आम्ही दादाच्या बरोबर जा ऽ णार ! जा ऽ णार ! "

" कुठें ? " मोठ्या कौतुकानें पेरुभट्टांनीं विचारलें.

" गंगेत स्नान करायला ! "

" गंगेत ? "

" हो ! दादा मला घेऊन जाणार ! गंगा, हिमालय, यमुना--हिमालय म्हणजे हिमाचें आलय ना हो ?—"

तों अम्मानें येऊन तिला वारले,

" पुरे ग ! स्नानसध्या होऊ दे त्याची ! घासभर भात खाऊन घेऊं दे. मग तेंच गाणें गायचें आहे ! "

" म्हणजे ? झालें तरी काय? जगन्नाथ कुठे आहे ? "

" घरींच आहे अजून ! "

पेरुभट्टाना कांहीं उमगलें नाहीं. पण घरातील हें कोंदट वातावरण पाहून त्याचा संतोष निम्मा कमी झाला. अम्मानें काहीं न बोलता त्याचें सध्येचें माडलें. सध्या उरकून जेव्हा पेरुभट्ट जेवायला बसले, तेव्हा आपलें एकट्याचें पान पाहून ते म्हणाले,

" दुर्गा कुठे आहे ? "

त्याच्या वाटींत सारम् वाढीत अम्मा म्हणाली,

" दुर्गा जेवली."

" आणि जगन्नाथ ? "

काहीं न बोलता अम्मानें तोंड फिरविलें, आणि आसवें पुसून टाकलीं.

पेरुभट्टाना काहीं उमगेनासें झालें. हातातला भाताचा गोळा तसाच झेलीत ते म्हणाले,

" आज झालें आहे तरी काय? जगन्नाथ कुठें आहे? त्यानें काहीं—"

" काहीं केले नाहीं त्यानें ! आणि लग्नहि करणार नाहीं तो ! "

" मग काय करणार ? "

" देशपर्यटण करणार—! "

नेमकी हीच भीति पेरुभट्टानाहि वाटत होती. तेहि मर्मज्ञ पंडित होते. शास्त्राच्या सखोल अध्ययनानें मानवी मनाचा अन्तस्तल परीक्षिण्याएवढी त्याची प्रज्ञा तरल झाली होती. जगन्नाथाच्या वृत्तींत अगदीं लहानपणापासून वास्तव्य करून असलेलें काव्य आतां अधिकाधिक विकसित होत आहे, असें अनुमान बाधूनच त्यानीं त्या काव्यावर विरजण घालण्यासाठीं

त्याच्याकडून वेदान्ताचें अध्ययन करवून घेतलें होतें. त्याना वाटलें, वेदान्ताच्या गुरुभारानें त्याच्यातलें काव्यजीवन स्थिरावेल, आणि नेमकें प्रपंचाच्या पाटातून वाहूं लागेल. पण आजची ही वार्ता ऐकून त्याना धक्का बसल्यासारखा झाला.

“ केव्हा सागितलेंन् त्यानें तुला ? ”

“ मघां ! ”

“ काय म्हणाला ? ”

“ तो म्हणाला, हिमालयावरील नीलाकाशात स्वच्छंद विहार करणारे राजहंस पहायचे आहेत त्याला ! ”

पुढें अम्माच्यानें बोलवलें नाहीं.

जो मनुष्य हिमालयावरील नीलाकाशातील राजहंस पाहूं इच्छितो, त्याच्या बाबतींत वेदान्ताध्ययनाचें औषध अगदींच निरुपयोगी आहे, हें हेरून पेरुभट्टाची मुद्रा पार उतरली. पुढें असलेलें सुग्रास अन्न त्याना विषवत् झाले.

जगन्नाथावर त्याचा अति स्नेह होता. आजपर्यंत त्याच्या मनाविरुद्ध एकहि गोष्ट न घडूं देण्याचा त्यानीं यथाशक्ति प्रयत्न केला होता. त्याच्या अलौकिक बुद्धिमत्तेचें तेज जेव्हा सहस्र मार्गांनीं प्रगट होई, तेव्हा पेरुभट्ट गर्हिवरून सर्वेश्वरास हात जोडून म्हणत,

“ तूं कृपाळु आहेस ! तूं मला एकच पुत्र दिलास, पण तेवढ्यानेच मी सतुष्ट आहें.”

पण तोच जगन्नाथ आता पंख फुटून उडून जाऊ पहात आहे, हें पाहताच त्यानीं ताट दूर सारलें.

“ हें काय ? जेवायचें नाहीं का ? उपाशी राहून कसे चालेल ? ” गद्‌गदून अम्मा म्हणाली.

“ असूं दे ! आता नाहीं जात जेवण ! ” पेरुभट्ट तसेच उठले. कुणीं लगुडप्रहार करावा, एवढें दुःख झालें अम्माला. कपाळावर हात देऊन ती मटकन् खालीं बसली.

....१२....

पेरुभट्ट हात पुशीत घराशेजारील पाठशाळेंत शिरले. आज पौर्णिमा असल्यानें अनध्याय होता. कुणीहि विद्यार्थी पाठशाळेंत डोकावणार नव्हता. पण नेहमींच्या सवयीप्रमाणें त्याचीं पाउलें पाठशाळेकडे वळलीं.

विमनस्कपणें त्यानीं मागील पडवींत डोकावून पाहिलें.

जगन्नाथ खांबाला टेकून उन्मनी अवस्थेंत उभा होता!

पेरुभट्ट थबकले. क्षणभर त्याचें मन तोल जाऊन कोसळूं लागलें. पण लगेच ते सावरले. स्वर स्थिर करून त्यानीं हांक मारली,

" जगन्नाथ ! "

चमकून जगन्नाथ त्यांच्याकडे वळला. गंधर्वनगरात यक्षकिन्नरांबरोबर विहार करणारी त्याची प्रज्ञा अपघात होऊन खालीं कोसळली. आपण आपल्या पाठशाळेंत उभे असून आपले वडील समोर उभे आहेत, हें त्याला कळलें. या प्रसंगास तोंड देण्यासाठीं तो सिद्ध होतो न होतो, तोंच पेरुभट्ट म्हणाले,

" इकडे ये बाळ ! "

जगन्नाथ आंत गेला. पेरुभट्ट आपल्या आसनावर बसले, आणि त्याला म्हणाले,

" बस ना ! उभा कां ? "

खालीं अंथरलेल्या दर्भासनावर बसून जगन्नाथ कुठेंतरी पहात राहिला.

" तूं उत्तरेंत जाणार आहेस ? "

काहीं क्षण थाबून जगन्नाथानें उत्तर दिलें,

" होय ! "

" केव्हा ? '

जगन्नाथ काहीं बोलला नाहीं. थोडें सावरून पेरुभट्टानीं जाळें टाकलें.

" चागला संकल्प आहे. मलाहि जायचें आहे एकदा. आपण सगळींच जाऊ काशीला. पण तूर्त तुला एक मोठी चागली संधि प्राप्त झाली आहे ! "

या विधानाचा जगन्नाथावर काय परिणाम होतो, तें पहाण्यासाठीं क्षणभर थाबून पेरुभट्ट पुढें म्हणाले,

" तिनुवेल्लीला एक मोठी प्रचण्ड सभा होणार आहे. खूप मोठा वाद होणार आहे तिथें. मला जाता येणार नाहीं, हवनात गुंतून रहावें लागणार आहे. माझ्या ऐवजीं तूं जा. आपल्या पांडित्याची चमक दाखवायची चांगली संधि चालून आली आहे तुझ्यासाठीं. तेव्हा—"

" बाबा ! " जगन्नाथ घुटमळत म्हणाला, " मी न गेलों, तर चालणार नाहीं का ? "

" का ? "

" केवळ घटोऽयं पटोऽयं करीत आपल्या पांडित्याचें कोरडें प्रदर्शन करणारे पंडित मला आवडत नाहींत ! ज्याचें अन्तःकरण रसानें परिपूर्ण नाहीं—"

" पण तुला जायला हवें जगन्नाथा ! मीं तसा शब्द दिला आहे ! माझ्याऐवजीं तूं येशील असें मीं त्या निमंत्रकाला सांगितलें आहे. मग ? माझें वचन खोटें होऊं देणार का तूं ? "

काहीं क्षण थाबून जगन्नाथ म्हणाला,

" जाईन मी ! "

पेरुभट्टांना समाधान झालें. त्यांना वाटलें, मासा गळाला अडकतोय् !



## .२.

तिनुवेल्लीच्या अति भव्य तलावाच्या काठावर अशोक वृक्षाच्या गर्द छायेंत चामुण्डेश्वराचे विशाल मदिर होतें. त्या मदिराचा सभामण्डप पण्डिताच्या वादविवादानें आज गजबजून गेला होता.

पण्डिताचे वाद ही गोष्ट काहीं दक्षिण देशाला अपूर्व नव्हे. तद्देशीय कृषिकाच्या भामिनी डोईवर नारळींच्या झावळ्याचे भारे घेऊन जात असतां जेव्हा एखाद्या देवळात भाडणाचा आभास होण्याएवढा गडगडाट ऐकत, तेव्हा त्या उपेक्षेनें म्हणत,

" ऊं: ! जाऊ दे ! नेहमींचेंच आहे तें ! "

" पण हे विद्वान् एवढे कडाकडा भाडतात का ग शूद्रासारखे ! "

" अग, काय तुला सागू ! " पहिली गदगदा हसून म्हणे, " हे भाडत नाहींत. "

" मग ? "

" भगवान् पशुपतीला बिल्वपत्र वाहिलें तर अधिक पुण्य होते, कीं निर्गुडीचीं पानें वाहिलीं असता स्वर्ग अधिक जवळ येतो, या विषयांवंर चर्चा करतात ते ! "

पण्डिताच्या पाडित्यप्रदर्शनाची ही एवढी प्रचण्ड संभावना करून हंसत खिदळत त्या वाटेनें चालत्या होत.

पण आजची सभा एवढी साधी नव्हती.

ज्या प्रश्नावरून दाक्षिणात्यामध्यें उघडउघड दोन तट पडले होते, ज्या पेंचामुळें अगदीं मुली देण्याघेण्यापर्यंत वाद निर्माण होत, ज्या निर्णयासाठीं अनेकदा पंडितानीं आपापसात द्वद्वें खेळून एकमेकाचीं डोकीं फोडलीं होतीं, ज्या यक्षप्रश्नामुळें भावाभावात, जावयासासऱ्यात, बापलेकात अबोले निर्माण झाले, ज्यासाठीं एकदा पतीच्या मागोमाग श्वशुरगृहीं प्रवेशलेल्या लकीबाळींना माहेरचीं दारें कायमचीं बंद होत, त्याचा आज निर्णय लागायचा होता.

'शिव श्रेष्ठ कीं विष्णु श्रेष्ठ,' याचा आज खल होणार होता !

खरोखरीच दक्षिणेंतली सामाजिक स्थिति मोठी विचित्र झाली होती. शैव आणि वैष्णवामधील द्वैत वाढता वाढता इतकें वाढले होते, कीं एकाच समाजगरुडाचे हे दोन पक्ष परस्पराशीं झोंबी खेळून एकमेकावर बाहिष्कार टाकण्याइतके कठोर झाले होते !

शिवकाचींत विष्णु या नावाचें माणूसच काय पण माकडसुद्धा आढळा-यचे नाहीं. नेमकें तसेंच विष्णुकाचींत. शैव आडवीं भस्में लावीत, घरें आडवीं सारवीत, आणि सरळ नाकासमोर उभे चालत तें केवळ निरुपाय म्हणूनच !

वैष्णव तरी का मागें राहातील ? त्याचीं गंधे उभीं, सारवणें उभें, नाहीं म्हणून मान डोलवायची ती उभी ! एक वैष्णव महापुरुष तर ब्रीदाला बट्टा लागेल, म्हणून उभ्याउभ्याच झोंपायचा ! तो एकदाच आडवा झाला, प्राण गेल्यावर !

हे उभयविध पंडित एकमेकाचें मुखावलोकनहि करायचे नाहींत. शैवाच्या दर्शनापेक्षा काकस्पर्शहि वैष्णवानें उजवा मानावा ! एकदा एका नदींतून काहीं शैव नावेंत बसून जात असता पाण्यात पोहत असलेल्या एका वैष्णवानें उगीच थकल्यामुळें आधार म्हणून नावेची नाळ धरली ! पण हा भ्रष्टाकारहि सहन न होऊन त्या शैवातल्या एका महाभागाने नदींत उडी घेतली, आणि पोहता येत नसल्यामुळे समुद्रास्तृप्यन्तु !

हास्यास्पद आणि पोरकट वाटावे, असे हें द्वन्द्व निर्माण झाले होतें

खरे ! आणि आजच्या सभेंत त्याच प्रश्नाचा खल होऊन काय तो निकाल लागायचा होता.

तिनुवेल्लीच्या महाराज हरिदेवरायाच्या प्रयत्नामुळें हा अपूर्व योगायोग आज घडून आला होता.

हरिदेवराय आणि त्याचे सामंत व्यंकय्या या दोघांना जेवढें कळे, तेवढें या पडिताच्या वेदाभ्यासजड मस्तकात शिरते तर—!

तर काय झाले असतें ? तर कदाचित् भरतखण्डात परकीय ताम्रांचें आणि बर्बरांचें पाऊलच न पडतें. पण— !

जाऊ द्या. चामुण्डेश्वराचें दर्शन घेऊन परत येताना एकदा हरिदेवराय म्हणाले,

" सामतराज ! मीं या दोन्ही पथाच्या आचार्यांना एकत्र बोलाविलें तर ते येतील ? "

" होय. दक्षिणा घेण्यासाठीं अवश्य येतील ! "

" म्हणजे ? "

" राजराज ! ते ब्राह्मण आहेत ! दक्षिणेचे आकर्षण त्याना खचितच ओढून आणील ! मात्र एक करायला हवें. "

" काय ? "

" जो पथ श्रेष्ठ ठरेल, त्याचा आपण स्वीकार करूं, असें आपण प्रकट करायला हवें. "

" पण—"

" नव्हे राजराज ! शैलशृगार्नी, कृष्णा—कावेरी—तुगभद्रार्नी आणि चंदनाच्या निबिड वनार्नी सुशोभित असलेला हा देश जर सुरक्षित ठेवायचा असेल, तर हा एवढा एकच उपाय आहे ! उत्तरेत इराणी-तुराणी घोड्याच्या टापार्नी भूमि उध्वस्त झाली आहे. केवळ नर्मदा आणि विंध्याच्या अडथळ्यामुळेच आजपर्यंत दुराणी स्वाराची पिसाट घोडदौड दक्षिणेत पुरता धुमाकूळ घालूं शकली नाहीं ! तरी देवगिरीला एकदा आपलें उन्नत मस्तक उग्र मुद्रेच्या यवन सेनापतीपुढें वाकवावेंच लागले ! तेव्हा अशा अस्ताव्यस्त स्थितींत दक्षिण जर या उपास्य

दैवताच्या वादामुळे दुभंगलेली राहिली, तर मग त्या घोडदौडीच्या धुळीमुळे रामेश्वराचें शिखरहि दिसेनासे व्हायला काहीं फारसा अवधि लागणार नाहीं. म्हणून काय वाटेल तें करून, प्रसंगीं थोडीशी सत्याशीं प्रतारणा करूनहि हें द्वैत मिटवायला हवें आहे ! ''

'' ठीक आहे ! निमंत्रणें जाऊं द्या चहूकडे. ''

आणि शेवटीं नाना प्रकारच्या अटी मान्य करून का होईना, महाराज हरिदेवराय चामुण्डेश्वराचा सभामडप उभय पक्षाच्या धुरंधर आचार्यांनीं मडित करण्यात यशस्वी झाले होते.

पहाटेपासून दोन्ही पक्षाचे विद्यार्थी एकमेकाकडे शत्रुभावानें पाहून धन्यता मानीत पोथ्याचे ढीग घालण्यात मग्न झाले होते. नाना प्रकारच्या बासनात गुडाळलेल्या लहानमोठ्या, नाना आकाराच्या पोथ्याचा जणूं एक डोंगरच तिथें निर्माण झाला होता. थोड्या वेळानें स्वतः महाराज हरिदेवरायाचे आगमन झालें. त्याच्या पाठोपाठ दोन्ही पक्षाचे दिग्गज आचार्य एकामागोमाग येऊं लागले.

त्या सर्वांचे वेश आणि अंगावरील चिन्हे याच्या एकत्रीकरणामुळें तिथें वेषवैचित्र्याचे प्रदर्शनच भरल्याचा आभास होत होता. मुख्यतः आडवें भस्म आणि उभें गंध या दोन चिन्हामध्ये त्या आचार्यांनीं एवढ्या परी निर्माण केल्या होत्या, कीं एखाद्या कुशल चित्रकारानेंहि त्या सभेंत येऊन काहीं शिकून जावे !

दोन्ही पक्ष समोरासमोर जमले तर होतेच. हरिदेवरायानीं प्रगट केलेली घोषणा आणि देऊं केलेली दक्षिणा या दोन आकर्षणापैकीं कोणत्या आकर्षणानें त्या पंडिताना इथे आणलें होतें, याचा निर्णय कुणालाहि देतां आला नसता. बहुधा सर्व पडित आपण केवळ महाराजाच्या घोषणेमुळेंच इकडे आलो आहोंत, दक्षिणा हे काहीं आपणास आकर्षित करणारें प्रलोभन नव्हे, असा निर्वाळा देत होते. पण महाराजानीं एका चौरंगावर दाय देण्यासाठीं जी सुवर्णमुद्राची रास घालून ठेवली होती, त्या राशीकडे प्रगट आणि चोरून मारून ते पंडित ज्या दृष्टीनें पहात, त्या दृष्टीकडे

पाहता पंडिताच्या गर्वोक्तीविषयीं संदेह निर्माण होण्यापुरती जागा तर निश्चितच होती.

काहीं का असेना, दोन्ही पक्ष एकत्र आले होते. एका देवालयाच्या सभामंडपात, एका बैठकीवर आणि एकाच वेळीं तो समुदाय जमला होता. तरी पण एकमेकाच्या मुखावलोकनानें निर्माण होणाऱ्या पापापासून दूर रहायची धडपड त्यातील प्रत्येकजण करीत होता. आणि एवढेंहि करून जर तो दोष अंगीं येऊन चिकटलाच, तर त्यापासून मुक्तता होण्यासाठीं कोणतें प्रायश्चित्त करावे, यासंबंधीं लहानसे वादहि आपापसात या पडितानीं खेळून घेतले होते.

सामंत व्यंकय्यानीं थोडा आग्रह धरला म्हणून, एऱ्हवीं एकमेकाचे मुखावलोकन टाळण्यासाठीं दोन्ही पडितसमूहात एक पडदा टागावा, अशीहि सूचना एका पंडितबुवानें केली होती !

निमत्रितापैकीं बहुधा सर्व पडित आले, असें पाहून महाराज हरिदेवरायानीं व्यकय्याकडे पाहून भ्रूसंकेत केला. व्यंकय्या आपले उत्तरीय सावरीत उभे राहिले, आणि चामुण्डेश्वरास नमन करून त्यानीं भाषणास प्रारंभ केला. महाराजानीं आमंत्रिलेल्या या पंडितसभेचे प्रयोजन सागून ते म्हणाले,

" तेव्हा पण्डितश्रेष्ठहो ! शिव आणि विष्णु या दोन्ही दैवतापैकीं कोणतें दैवत सर्वश्रेष्ठ आहे, तें एकदाचें ठरून जाऊ द्या. दक्षिणेतील सर्व वागीश, धुरंधर, वादिनगेन्द्र, दिग्गज अशा पण्डिताचा समूह आज इथें एकत्र झाला आहे. या सभेंत जो निर्णय ठरेल, तो उभयपक्षास बंधनकारक मानावा लागेल. दक्षिणदेश ज्या वादानें भुग्यानें पोखरलेल्या झाडासारखा पोकळ झाला आहे, तो वाद आज श्रीचामुण्डेश्वराच्या साक्षीनें शेवटास यावा, अशी महाराजाची इच्छा आहे.

" दोन्ही पक्ष समोर उपस्थित आहेत. कोणीहि पूर्वपक्ष करून वादास प्रारंभ करावा, अशी महाराजांकरितां मी विनंती करतो. "

दोन्ही पक्षाच्या पंडितानीं आपापल्या विद्यार्थ्याकडे पाहिलें. शेवटीं एक वैष्णव विद्यार्थी उठून उभा राहिला. तो म्हणाला,

" प्रत्येक ब्राह्मणानें संध्या करावी, असें शास्त्रवचन आहे.

" अहरहः स्नात्वा संध्यामुपासीत ।
" संध्येंतील प्रधान अंग गायत्रीजप हे आहे.
" गायत्रीमंत्रांत सूर्याच्या उपासनेचा उल्लेख आहे.
" सूर्य हा जगताचा आत्मा आहे—
" सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ।
" त्या अर्थी तो भूताचें भरणपोषण करणारा आहे.
" सूर्य हें विष्णुदेवतेचेंच स्वरूप आहे.
" स्मृतिकार विष्णुदेवतेचा उल्लेख भूतभृत् असा करतात.
" त्या अर्थी विष्णुदेवता ही सर्वश्रेष्ठ देवता आहे"

आपण अगदीं बिनतोड युक्तिवाद केला, अशा धारणेनें विरुद्ध पक्षाकडे विजयी मुद्रेनें पहात तो विद्यार्थी खालीं बसला.

तोंच एक शैव पण्डित उठून उभा राहिला. आपल्या कंठस्वरानें सभामंडप कापवीत तो म्हणाला,

" माझेंच बाळ तेवढें चागलें, असा उद्घोष करणे, हा सामान्य जनाचा स्वभावच आहे.

" पण्डित मात्र योग्यायोग्यतेचा विचार करूनच वागत असतात.

" आता केला गेलेला पूर्वपक्ष—पूर्वपक्ष तरी कसें म्हणता येईल त्याला ?

" त्याला उत्तर द्यावें, एवढीहि त्याची योग्यता नाहीं.

" पण दुर्दैवानें तीं विधानें पूर्वपक्ष म्हणून केलीं गेलीं आहेत.

" तेव्हा त्याचा समाचार घेणें युक्त आहे.

" ज्या सूर्याची आता तोंड फाटेपर्यंत स्तुति केली गेली, त्याचेच नाव विवस्वान्.

" विवस्वान् द्विज होता, अर्थातच पूर्वपक्षीयाच्या मताप्रमाणेंच त्यालाहि संध्याकर्म विहित होतें.

" संध्येंत त्र्यम्बकाची स्तुति केली गेली आहे.

" त्र्यम्बकं यजामहे सुगंधिं पुष्टिवर्धनम् ।

" त्र्यम्बक या नांवानें भगवान् पशुपतिच अभिप्रेत आहे.

"त्या अर्थीं विवस्वानाने ज्या पशुपतीचें स्मरण केलें, तोच या सर्व जगताचें आदिकारण आहे.

" विवस्वान् आदि सर्व त्या सर्वेश्वरापुढे कालच्या पोराप्रमाणें आहेत.

" म्हणून शिवदेवता हीच सर्वश्रेष्ठ आहे.

" ॐ नमः शिवाय ! "

आपण निर्वीरमुर्वीतलं केले, अशा थाटात चहूकडे पहात तो पण्डितश्रेष्ठ खालीं बसायचा अवकाश, आणि मग जी रणधुमाळी सुरू झाली, ती काहीं सागता पुरवत नाहीं !

भडाभडा पोथ्या उलगडल्या जाऊं लागल्या. प्रमाणाचा कीस पडला. कोणता ग्रथ ग्राह्य आणि कोणता अग्राह्य याबद्दल वादावादी होऊन ती डोकीं फुटण्यास कारणीभूत होणारसा रंग दिसू लागला. पंडिताच्या सभेचें रूपातर लवकरच रणभूमींत होणारसें भासूं लागलें. स्वतः महाराज हरिदेवरायानाहि त्या प्रकारास कसा आवर घालावा ते कळेनासें झालें.

शेवटीं त्यांनीं सहेतुकपणें व्यंकय्याकडे पाहिलें. ते उठून उभे राहिले.

त्याच्याकडे ध्यान जाताच कोलाहल काहींसा शमला, हें पाहताच ते म्हणाले,

" पण्डितश्रेष्ठहो ! अजून आपल्या मुख्य प्रश्नास तोंड लागलें नाहीं. ज्या अर्थीं अजून कोणते दैवत श्रेष्ठ या प्रश्नास नेमका प्रारंभ झाला नाहीं, त्या अर्थीं त्या प्रश्नापूर्वी उभय पक्षातील पण्डितांनीं महाराजाच्या एका शंकेचें उत्तर द्यावे, अशी महाराजाची प्रार्थना आहे. "

" कोणती शंका ? " वैष्णव पक्षातील एका पाण्डितानें विचारले.

" ती शंका आपल्यासमोर पण्डित जगन्नाथ माडतील ! "

" पण्डित जगन्नाथ ? " दोन्ही पक्षात मर्मरध्वनि उठला.

जगन्नाथ उठून व्यंकय्याच्या शेजारीं जाऊन उभा राहिला.

" अरे ! हा तर पेरुभट्टाचा मुलगा ! "

" आमच्या मुन्गुंडुला याचें घर ! "

" याचा पिता आमचा गुरुबंधु ! "

“ कसा ? ”

“ कसा म्हणजे ? तो आणि आम्ही श्रीगुरु ज्ञानेंद्र भिक्षूंजवळ वेदान्त शिकलो ! ”

“ आणि हा आम्हाला प्रश्न विचारणार ? ”

“ त्याला म्हणावें, प्रश्न कसे विचारावे, ते आम्हाजवळ शीक ! ”

“ हा आमचा अपमान आहे ! ” .

“ महाराजाना आमची अप्रतिष्ठा करायची आहे ! ”

“ अशा पोरासोराकडून प्रश्न विचारवून महाराज आमची थट्टा करीत आहेत ! ”

“ या पोराला पण्डित पदवी दिली कोणीं ? ”

या आणि अशा अनेक प्रश्नानीं सभामंडप निनादित झाला. पण जगन्नाथाचा कंठस्वर त्या गोंगाटाचा भेद करून वर उठला. तो निश्चयी, आत्मविश्वासानें परिपूर्ण स्वरात बोलला,

“ पण्डितश्रेष्ठहो ! ऐका !

“आपल्याला माझ्यासंबंधीं कांहींहि बोलण्यापूर्वीं एक गोष्ट विचारात घेतली पाहिजे. ती अशी, कीं मी जो प्रश्न आपणासमोर माडणार आहें, तो माझा स्वतःचा नसून महाराज हरिदेवरायाचा आहे.

“ तेव्हा पृच्छकाची ही अशी अप्रतिष्ठा करून आपण स्वतः महाराजांचा अपमान करीत आहात ! ”

हें ऐकताक्षणींच सभेत निस्तब्ध शातता पसरली ! पण्डित जगन्नाथ पुढें म्हणाला,

“ दुसरें असें, कीं पण्डित पदवी कुणीं द्यावी लागत नाहीं ! मृगेन्द्राला वनाचा अधिराज म्हणून अभिषेक करावा लागत नाहीं ! जन्मताक्षणींच तो सम्राटपदाचीं किरीटकुंडलें अंगावर लेऊन येतो !

“ आणि पोरसोर म्हणून आपण माझा अधिक्षेप करतां ?

“ सूर्यबिंब दिसायला बचकेएवढेच असते ! पण त्याचा उदय होताक्षणींच संपूर्ण जगतास ग्रासून टाकणारा अंधकार कुठें औषधापुरताहि सांपडत नाहीं, हें आपल्या स्मरणात आहे ना ? ”

एक महामहोपाध्याय गुरगुरले,

“ अरे ! हा शास्त्र्याच्या सभेंत काव्य बोलतो—! ”

“ होय ! ” जगन्नाथ निर्धाराने म्हणाला,

“ मी काव्य बोलतों ! मी एकटाच नव्हे, तर ज्या वेदमंत्राना तुम्ही उरींशिरीं वागविता ते वेदमंत्रहि काव्य आहेत ! त्यांचे उद्गाते ऋषि अत्यत श्रेष्ठ कवि होते ! त्यानीं पूर्वाकाशाला आपल्या अरुणवर्णानें आलोकित करून सोडणारी उषा पाहिली, आणि त्यांच्या हृदयातील काव्य वाणीचा हात धरून बाहेर आलें ! त्यानीं क्षमाशील पृथ्वी पाहिली, असीम आकाश पाहिले, अमर्याद सागर पाहिला, अलौकिक तेज पाहिले ! आणि त्याची प्रतिभा साकार झाली !

“ नवनवीन शब्दाचे अलंकार लेऊन ती शब्दरूप झाली ! अलौकिक अर्थसौदर्याने—”

एवढ्यात एक पण्डित उभा राहून तावातावाने म्हणाला,

“ ऐक रे पोरा ! तूं महाराजाचा प्रतिनिधि म्हणून उभा आहेस, यासाठींच ही तुझी बडबड आम्हीं एवढा वेळ मुकाट्याने सहन केली ! एरव्हीं—”

“ नाहीं तर काय ! ” दुसऱ्यानें साथ दिली.

“ मुद्याचें बोल आता ! नाहींतर--” तिसरा धुसफुसला.

“ खालीं बस ! ”

‘ ओढा त्याला अलिकडे ! ”

“ पण्डिताची अप्रतिष्ठा केल्याबद्दल—”

“ ठोका ! पहाता काय ! ”

“ कालचा पोर ! आम्हाला शिकवायला चालला ! ”

“ आमच्या स्वाधीन करा त्याला--”

प्रसंग अनावर होत चालला, हें पाहून स्वतः हरिदेवराय उभे राहिले आणि म्हणाले,

“ ऐका ! ऐका ! ”

सभा शात झाली. महाराज पुढें बोलले,

" आपल्यासारख्या धर्मज्ञांच्या सभेतहि एवढी हातघाई व्हावी, हें कितीसें योग्य दिसतें, याचा आपण विचार करा ! "

"पण महाराज, आपला हा प्रतिनिधि काय वाटेल ते बोलू लागला–"

" थांबा ! पण्डित जगन्नाथ जे काय बोलत होते, तें रसिक मनाला रुचणारेंच होते यात काहीं शंका नाहीं. आपण त्याच्यावर जो आरोप केलात त्याचे ते यथायोग्य उत्तर देत होते ! "

" स्वतः महाराजाचेंच जर हें मत असेल, तर आम्हाला काहीं म्हणायचें नाहीं. पण या सभेत सगळ्या दक्षिणदेशींचे दिग्गज पण्डित गोळा झाले असता या सर्वांचा या कालच्या पोराने जो अपमान केला आहे, ती काहीं विसरण्याजोगी वस्तु नव्हे ! याबद्दल याला अवश्य देहदण्ड सोसावा लागेल–"

जगन्नाथाची गौर मुद्रा लाल झाली होती. तो आपला आवेग कसा तरी सावरून धरीत होता. पण दण्डाचे नाव निघताच त्याचा क्रोध तप्त रसासारखा उचंबळून आला. तो गर्जला,

" एरंड कितीहि उंच वाढला, तरी तो इक्षुदण्डाची बरोबरी करूं शकत नाहीं. अहो वार्धक्याची प्रौढी गाणाऱ्या पण्डितानो ! तुम्हा बधिराच्या सभेत मीं पंचमाची तार छेडली, हीच माझी चूक झाली ! जातिवंत प्रतिभेच्या कवीला तुम्ही कसले भय घालता ? देहदण्डाचें ?

" अरे ! ती सर्वस्पर्शी प्रतिभा तुमच्या या दण्डभयापासून किती तरी दूर उभी आहे !

" लक्षात ठेवा, तुम्हां अरसिकांपासून मी माझी कवितादुहिता दूर घेऊन जाईन !

" तिथे ! जिथें तिचे उचित मूल्य होईल अशा स्थानीं !

" जिथे रसिकांच्या स्नेहाचें जीवन मिळून ती नवनवोन्मेषशालिनी होईल !

" जिथें आपल्या अद्भुत, अलौकिक बहरानें ती रसिकाना तोषदायिनी होईल !

" जिथें तिच्यावरून आपल्या प्राणांच्या कुरवंडी करून टाकणारे मधुकर तिच्याभोवतीं रुंजी घालतील !

" जिथें ती त्या मधुकरांसाठीं जगेल—आणि—

" मधुकर तिच्यासाठीं !

" तिथे ! दूर ! उत्तरेंत ! हिमालयाच्या उत्तुग शृंगांच्या छायेंत ! पयस्विनी गंगेच्या तटाकीं !

" तिथे ! यमुनेच्या पुलिनात ! बालगोपालाच्या क्रीडाभूमींत !

" तिथे—तिथें—! "

जगन्नाथाच्या शिंपाएवढाल्या नेत्रातून भावावेशामुळे आसवे झरूं लागलीं ! सगळी सभा चकित झाली.

महाराज हरिदेवराय जगन्नाथाजवळ गेले. त्याच्या पाठीस करस्पर्श करून ते मऊ शब्दात म्हणाले,

" पण्डित जगन्नाथ ! आमच्या मनात आपणाविषयीं आदर निर्माण झाला आहे ! हे विद्वान् जरी––"

ताडकन् जगन्नाथ म्हणाला,

" क्षमा करा महाराज !

" एकमेकावर केवळ मतभिन्नतेमुळें शेणमार करणारे हे विद्वान् ! सर्वशक्तिमान् चैतन्याच्या एका स्वरूपाविषयीं अभिनिवेश धरून दुसऱ्याशीं आजन्म शत्रुत्व करणारे हे पण्डित !

" त्या असीम चैतन्याच्या कितीशा भागाचा याना साक्षात्कार झाला आहे ?

" ज्याच्या कृपेचा लवलेश प्राप्त होताच—

" द्वेष हारपतो, वासना पागुळते—

" मत्सर विरतो, कामना दडी देते—

" अहकार मुरतो, भावना तन्मय होते—

" ज्याचा अनुग्रह प्राप्त झाला असता—

" जीव सिद्ध होतो, तृप्त होतो, मत्त होतो—

" काहीं मिळवायचे रहात नाहीं, काहीं राखायचे उरत नाहीं—

" शोक नाहीं, मोह नाहीं—

" जो रसरूप आहे, अमृतस्वरूप आहे—

...२५...

" ज्याची कृपादृष्टि वळताच—
" बोलणें बंद होते, डोलणे थाबते—
" काहींहि करता येण्यासारखें नाहीं म्हणून—
" कांहींहि केलें असता तें निरुपयोगी ठरेल म्हणून—
" त्या परमात्म्याच्या स्वरूपाविषयीं याना कितीसें ठाऊक आहे ?
" जो एक असूनहि नानाविध रूपानीं नटला आहे—
शिवरूपाने आणि विष्णुरूपानें—
" एकं सद्विप्रा बहुधा वदान्ति—
" त्याला जे शिव्या घालतात, त्याच्यापासून कोणाचे भलें व्हायचें नाहीं !
" कुणाचेहि नाही !
" कुणाचेहि नाहीं ! "
बोलत बोलतच जगन्नाथ सभेतून बाहेर पडला.
सगळ्या पण्डितांचीं तोंडे काजळाने माखल्यासारखी झालीं.



# ३.

सभेंतील वृत्त जरी जगन्नाथाने पेरुभट्टाना सागितले नाहीं, तरी तें शतशत मुखानीं सहस्रगुणित होऊन त्याच्यापर्यंत पोचले. एका भिक्षुकानें तर ही तार अगदीं इथपर्यंत ताणली,

" अय्योयो ! ऐकलेत काय पेर्वय्या ! स्वतः महाराज हरिदेवराय तुमच्या मुलावर इतके प्रसन्न झाले, कीं त्यांनीं आपला मुगुट उतरून आपल्या हातानीं जगन्नाथाच्या डोक्यावर ठेवला ! "

पेरुभट्टानीं हें ऐकून सुटकेचा एक निःश्वास तर टाकलाच, पण जगन्नाथाच्या मुग्धतेमुळे अस्वस्थ असणारी अम्माहि विसांवली. तिनें मनोमनीं सगळ्या ग्रामदेवताच्या दारीं तोरण बाधायचा सकल्प केला.

दुपारीं मुद्दाम शारदाम्बेच्या घरीं जाऊन तिने आपल्या सकल्पित सुनेला जवळ घेतले, आणि तिच्या तोंडावरून हात फिरवून म्हणाली,

" सून माझी मोठी गुणाची आहे हो ! आता या वर्षीं काहीं तुला मी या घरीं राहू देत नाहीं ! "

अम्मा नको नको म्हणत असताहि तिच्या समोर केळीच्या पानावर काजूचा लाडू ठेवीत शारदाम्बा म्हणाली,

" अगदीं भार झालाय् हो बाई आता ! तुमचें माणूस केव्हा तुम्ही आपल्या घरीं नेताय्, असें झालें आहे मला ! "

अम्मानें पोरीला आपल्या कुशींत ओढीत म्हटलें,

" नेईन हो, नेईन ! आता नाहीं उशीर करायची ! "

पेरुभट्टानींहि पाठशाळेची जुनी झालेली पडवी पाडून तिच्या जागीं नवी मोठी पडवी बाधायला घेतली. लाकडें ताशीत बसलेल्या सुताराला ते म्हणाले,

" गेरप्पा, कमींत कमी पन्नास विद्यार्थ्यांनीं एकदम सथा घ्यावी, अशा अंदाजाचा इमला अदाजून काम करा बरें का ! "

तबाखूची पिंक टाकून, वाकस थाबवीत गेरप्पा हेल काढीत बोलला,

" अय्योयो ! सामी, इतकी मोठी पडवी ? "

" तर ! आता पाठशाळा जगन्नाथाकडे सोपवायची ! त्याच्याकडे शिकण्यासाठीं विद्यार्थ्यांची नुसती तोबागर्दी होईल बघ ! "

त्यानतर त्यानीं आवाज बारीक करून जेव्हा जगन्नाथानें तिनुवेल्लीला केलेला पराक्रम गेरप्पाला सागितला, तेव्हा गेरप्पा वाकस खालीं ठेवून दक्षिणेकडे नमस्कार करीत म्हणाला,

" ऐकलेत सामी ? ही रामेश्वराची कृपा ! "

" तर रे ! तिच्याशिवाय का होते हें सारे ? "

पण ज्या जगन्नाथासाठी अगदीं कबरा बाधून ही मडळी सिद्धतेला लागली होती, तो मात्र या कृत्यांची दखल घेण्याच्याहि मनःस्थितीत नव्हता !

दुर्गाम्बा त्याच्या गळयात पडून त्याला विचारी,

" होय रे दादा ? तूं तो मुगुट माझ्यासाठीं का नाहीं आणलास ? "

अंदाजें दहा वेळा जगन्नाथाला हलवून शेवटीं ती त्याच्या कानापाशीं ओरडली, कीं मग जागा झाल्यासारखा तो विचारी,

" काय म्हणत्येस ? "

" अरे मुगुट ! "

भावावेगाने दुर्गाम्बेला आपल्या अगदीं जवळ ओढून जगन्नाथ म्हणे,

" बरे का दुर्गे ! मोरपिसाचा मुगुट आहे त्याच्या मस्तकावर ! "

आश्चर्यानें ती म्हणाली,

" कोणाच्या ? "

" तमालनीलाच्या ! श्रीकृष्णाच्या ! कल्पद्रुमातळीं देहुडा पाय ठेवून जो वेणु वाजवीत आहे—तूं चलशील त्याला पहायला ? "

तो जयदेवाच्या काव्यपंक्ती गुणगुणूं लागे—

'मलयसमीरे यमुनातीरे वसति वने वनमाली ॥'

दुर्गाम्बाला वाटे, माझ्या दादाला काहींतरी झालें आहे !

जगन्नाथ जेवायला बसे, तेव्हा पाण्याचा पेला हातात धरून तो चिंतनात मग्न होई.

अम्मा म्हणे,

"अरे ! काहीं पडलें आहे का पाण्यात ?"

जगन्नाथ चमकून म्हणे,

"पाण्यात ? हो !"

"काय ?"

"पुष्कळ !"

"पुष्कळ ?"

"हो ! मासे ! कासवे--"

"अरे झालंय् काय तुला ?"

"मला ? कांहीं नाहीं ! खरोखरीच गंगेच्या पाण्यात मोठमोठाले मच्छ, मगरी--! अम्मा, तिच्या तीरीं ताल आहेत, तमाल आहेत--

'एतत्तालतमालसालसरलव्यालोलवल्लीलता-
च्छन्नं सूर्यकरप्रतापरहित शखेन्दुकुन्दोज्ज्वलं
गन्धर्वामरसिद्धकिन्नरवधूतुङ्गस्तनास्फालितं
स्नानाय प्रतिवासर भवतु मे गाङ्गं जलं निर्मलम् ॥'

"गंगा ! अहा ! गंगा ! अम्मा, तूं चलशील गगेवर ?"

"चल ! मला नाहीं वेळ गगेवर यायला ! माझीं हाडे गंगेत नेऊन टाका म्हणजे झालें !"

पण जगन्नाथाच्या कानीं यातला एक शब्दहि जात नसे.

एखादा नूतनागत विद्यार्थी रामोहरि:ला प्रारभ करताच जगन्नाथाचें मन दक्षिणेंतून अयोध्येत पोहोंचे. तिथले रामकालीन प्रासाद, अट्टालिका, गवाक्षें, वीथिका हें मनसोक्त पाहून झाल्यावर तें म्हणे,

"हा मार्ग माझ्या रामरायाच्या शयनमंदिराकडे जातो !

" ऊ हूं ! तिकडे नाहीं जायचें !

" तिथें असेल जगज्जननी सीता ! ती श्रीरामाचे कोमल चरण चुरीत बसली असेल ! तिच्या त्या समाधीचा भग नाहीं करणार मी ! मला इथेंच थावले पाहिजे—द्वाराच्या बाहेर ! "

एवढ्यात तो विद्यार्थी विचारी,

" भानुःकर्ताच्या पुढे ? "

खाडकन् जगन्नाथाची भावसमाधि उतरे.

दिवसेदिवस तो अधिकाधिक हारपत चालला.

शरदाची पौर्णिमा उगवली. चन्द्रोदय होऊन एक प्रहर लोटला. जगन्नाथ अगावर केवळ एक उत्तरीय घेऊन बाहेर निघाला. अंगणात तुलसीवृंदावनाजवळ दुर्गाम्बा अम्माच्या कुशींत बसून तिरुमल्लवाराची कथा ऐकण्यात तल्लीन झाली होती.

" तिरुमल्लवार कमळाला म्हणाला—"

" कमळाला ? " दुर्गाम्बा म्हणाली.

" ऐक ग ! नुसतें हूं हू म्हणत जावे. असें मध्येच विचारू नये. तर तो म्हणाला, कमळा, तूं धन्य आहेस ! रानभर हिंडणारे उनाड भ्रमर--"

कथा खडित झाली. जगन्नाथ बाहेर जातोय् हें पाहून अम्मा म्हणाली,

" कुठें निघालास ? "

" आ ? " चमकून जगन्नाथानें विचारलें.

" अरे, निघालास कुठें रात्रींचा ? "

" अं ? कुठें नाहीं ! "

" नाहीं कसा ? निघाला आहेस कुठें तरी."

" मी ना ? हो ! थोडा फिरून येतों."

" लवकर ये. फार लांब जाऊ नकोस. अरे हो ! मी तुला सागायचें विसरलें. उद्या मी शारदाम्बेला घरीं जेवायला बोलावलय्."

" शारदाम्बेला ? "

" हो. तुला कुठे जायचें नाहीं ना उद्या ? "

" मला ? नाहीं. जायचें नाहीं ! "

" लवकर ये बरें का दादा ! आज मी तुझ्याजवळ झोंपणार आहें !" दुर्गाम्मा म्हणाली.

जगन्नाथ घराबाहेर पडला. त्याची अस्मिता म्हणाली,

" मला कुठें जायचें नाहीं. कुठेहि जायचे नाहीं.

" जायचे नाहीं ? नाहीं कसे ? जायचें आहे !

" मला उत्तरेंत जायचें आहे !

" मला गगा बोलावीत आहे. मला हिमालय आमत्रीत आहे. मला यमुना साद घालीत आहे !

" मला हें सगळे धाडोळायचे आहे ना !

" या सगळ्यातला भव्यपणा मला अनुभवावयाचा आहे.

" आजपर्यंत ज्या कविरत्नानीं आपल्या काव्यश्रीच्या अलंकारांनीं उत्तरापथ नटवला, त्याना मोह पाडील असें तिथे काय आहे तें मला पहायचे आहे !

" या देशात काव्याची किंमत नाहीं.

" केवळ रुक्ष व्याकरणाच्या उतरडी चढण्याउतरण्यातच या लोकाना पितर स्वर्गीं गेल्यासारखे वाटतें. प्रत्यक्ष भासमान होणाऱ्या या चेतनाशील, आनदघन जगताचा बाध करण्याची धडपड करण्यात याना कृतार्थता वाटते—"

संथ जलौघात धोंडा कोसळावा, तसा वळणावर देवळातला पुजारी भेटून खरखरीत स्वरात बोलला,

" कोण तें ? जगन्नाथरायरु ? "

जगन्नाथ काहीं न बोलता क्षणभर थबकला, आणि पुढें चालूं लागला. त्यानें यत्नपूर्वक आपल्या विचारांची तार मघाच्या सप्तकात लावली,

" प्रत्यक्ष आणि अनुमानाचे डावपेच खेळण्यात बुद्धीचा कस खर्च झाल्यानें हे पण्डित उबगून गेले आहेत ! त्यामुळें चक्रवाकाच्या विरह-गीतात त्याना एका पक्षाच्या केकाटण्यापलीकडे कांहीं सापडत नाहीं !

" चदनाकडे हे केवळ लाकूड याच दृष्टिकोनांतून पाहतात. कमलाचें

विकसणें आणि संकोचणे, हें यांना भ्रममूलक सृष्टीचा केवळ एक प्रकार वाटतें !

" मृगनयना विलासिनींचें स्मित आणि भ्रूलीला याना पारध्याच्या फासाप्रमाणें वाटतात. त्याचे कज्जलसम केशभार याना कोळ्याच्या जाळ्या-प्रमाणे भासतात.

" त्याचे विरहव्यथेमुळे उष्ण झालेले श्वास याना खैराच्या इगळाप्रमाणे दाहक होतात. त्यांचें मधुर संभाषण याना विषलिप्त बाणाप्रमाणें टोंचते.

" हे अरसिकाचे शिरोमणि, यानीं या सुन्दर देशाची गरिमा लुप्त करून टाकली आहे !

" माझ्या कोकिलकुजिताचा इथे काय उपयोग ? मी याच्याहून वेगळा आहें, असें याना कळताच हे माझे जीवित विषाक्त करून टाकतील ! "

एकदम जगन्नाथाच्या अंतरात शब्दाची सेना त्रिभुवन आदोळीत आली आणि पहाता पहाता त्यांतून एक सुंदर गीतिवृत्तातील श्लोक तयार झाला.

एकस्त्वं गहनेऽस्मिन् कोकिल न कलं कदाचिदपि कुर्याः ।
साजात्यशङ्कयामी न त्वा निघ्नन्ति निर्दयाः काकाः ॥

त्या निर्मितीच्या मदानें उन्मत्त झाल्यासारखा जगन्नाथ चालत राहिला. गावातील घरें, मंदिरें हे सर्व हळूहळू दिसेनासें झालें. वरून निथळत असलेली चंद्रिका आणि खालीं त्या प्रकाशानें आलोकित झालेला मार्ग. पुनः त्याला जाग आली.

" अम्मा म्हणाली, ती शारदाम्बेला जेवायला बोलावणार आहे !

" ती मला पायीं शृखला घालून इथे जखडून ठेवूं इच्छिते !

" मी राहणार नाहीं ! मुळींच राहणार नाहीं !

" या क्षणीं मी उडून जाणार ! कवितावनांतला मी कोकिल आहें ! तिचा तो पंजर, ते डाळिंबाचे दाणे मला भुलवूं शकणार नाहींत !

" बाबाना मी जाईन याची कल्पना आहे. कालाची गति ओळखून ते स्वस्थ बसतील.

" पण दुर्गाम्बा—

" तिचें माझ्यावर फार प्रेम आहे !

" अहा ! माझी ती लाडकी बहीण !

" ती मला हवी आहे !

" माझी ती एकुलती अनुजा मला फार फार आवडते !

" तिला सोडून मी कसा जाऊं ?

" नाहीं ! मला जाता येणार नाहीं !

" मी जाऊ शकणार नाहीं ! "

जगन्नाथ थाबला. मार्गाच्या कडेलाच एक विस्तीर्ण शिलाखड होता. त्यावर तो बसला, आणि त्याच्या अतरात तुमुल युद्ध सुरू झालें. त्या युद्धात झालेले व्रण अश्रूचे रूप लेऊन त्याच्या गालावरून टपाटपा धुळींत गळू लागले.

पण शेवटीं तो त्या युद्धात विजयी झाला. तो म्हणाला,

" दुर्गे, तूं माझ्यावर निरतिशय प्रेम करत्येस !

" मींहि तुझ्यावर अपूर्व स्नेहाचा वर्षाव केला आहे !

" पण म्हणूनच तर मी निघालों आहें !

" माझी कविता नवनवीन रूपानीं आकारास येईल ! माझ्या प्रतिभेला रसिकतेचें जीवन प्राप्त झाल्यावर ती फळाफुलानीं डवरून निघेल ! आणि मग भल्याभल्याची दृष्टि तिचा तो अपूर्व विस्तार पाहून चकित होईल ! ते म्हणतील, आम्ही धन्य आहोत !

" कारण, आम्हीं जगन्नाथाच्या काव्यचातुरीचा रसास्वाद अनुभवला आहे !

" दुर्गे, मग दक्षिणहि मला वंद्य मानील; माझ्याभोंवतीं निर्माण झालेले कीर्तिवलय पाहून ती म्हणेल, वा: वा: ! जगन्नाथ तर आमचा कवि आहे ! मी दक्षिणेंत जन्मलों, याबद्दल ती स्वतःला धन्य समजेल !

" तेव्हा मग मी परतेन ! तुला भेटण्यासाठीं !

" तूं त्या वेळीं मोठी झाली असशील !

" कुणा भाग्यवंताची कामिनी होऊन त्या वेळीं तूं आपल्या चिमुकल्या छकुल्याला पाजीत बसली असशील !

" माझ्या पाठीमागें धावत असलेल्या जनसंमर्दाच्या पायरवानें उड-

णारी धूळ पाहून तूं आश्चर्यचकित होऊन उठशील. भयाने किंचित् विवर्ण झाल्यामुळें तुझ्या मुद्रेवर पाडुरता आलेली असेल !

" तुझा बाळहि मुखातला स्तन तसाच सोडून या गमतीकडे पाहू लागेल. तो स्तन झाकण्यापुरतेंहि अवधान तुझ्याजवळ शिल्लक राहा-णार नाहीं.

" पण एवढ्यात मी दारीं येऊन उभा राहीन !

" प्रारभीं तूं मला ओळखणार नाहींस !

" पण मग मी तुला हाक मारून म्हणेन,

" 'दुर्गे, मी जगन्नाथ आलो आहें !'

" मग तूं धावत धावत येऊन आपला बाळ माझ्या हातीं देशील आणि म्हणशील,

" 'दादा, तूं का आलास तें मला माहीत आहे ! पण आता मी मोठी झाल्यें आहे !

" 'माझ्या ऐवजीं तूं या माझ्या बाळाचे चुबन घे !'

" मग मी तुझ्याकरिता उत्तरेंतून आणलेलीं हस्तिदंताचीं खेळणीं त्याच्या हातीं देईन !

" पण दुर्गे, याच्यासाठीं मला आता तुला सोडून जायला हवें !

" तेव्हा तूं माझी वाट पहात थाबू नकोस !

" माझ्या सकल्पाच्या पायातील शृखला होऊ नकोस तूं, दुर्गे ! "

जगन्नाथाने पुनः एकदा आपलीं आसवें पुसलीं, आणि तो निर्धारानें पुढे निघाला.

चारसहा कोस जमीन चालून गेल्यावर त्याला चहूंबाजूनीं वृक्षानीं झाकलेलें एक देऊळ लागलें. त्या देवळाच्या सभामंडपात त्यानें प्रवेश केला.

देऊळ श्रीरंगाचें होतें. देवतामूर्तीसमोर नदादीप तेवत होता. सभा-मंडपात पुजारी आणि दोनतीन प्रवासी झोंपले होते.

जगन्नाथानें देवतेस नमस्कार केला. तो मनात म्हणाला,

" श्रीरगा ! तूं माझ्या या देशत्यागाचा साक्षी आहेस !

" कांहीं दिवसांनीं मी परत फिरेन, तेव्हां मी तुझ्या दारीं असाच उभा राहून तुला नमस्कार करीन !

" पण त्या स्थितींत आजपेक्षां कितीतरी परिवर्तन झालेले असेल !

" आज मी एकटा आहें.

" त्या दिवशीं माझ्याभोंवतीं माझ्या काव्यशक्तीनें आकर्षित झालेला जनसमूह असेल !

" तूं मला साहाय्यदाता हो ! "

आपलें उत्तरीय अंथरून जगन्नाथ मुकाट्यानें झोंपीं गेला. वाटचालीच्या श्रमानीं लगेच त्याला झोंप लागली.

सकाळीं तो जागा झाला पुजाऱ्याच्या भाषणानें.

" कोण झोंपला आहे कोण जाणे रात्रीं येऊन ! " पुजाऱ्याची बायको म्हणाली.

" कोण कीं ! मला माहीत नाहीं ! "

" तुम्हीं त्याला विचारूं नये ? हल्लीं कुणाचा पायपोस कुणाच्या पायांत नाहीं ! सारखे घोडेस्वार इकडून तिकडे घोडे फेंकीत असतात ! मेले घोडींहि उधळवतात, अन् आम्हाला लुटतातहि ! "

" नाहीं ग ! हा त्या जातीचा दिसत नाहीं ! मुद्रा बघ त्याची ! "

" तुम्हींच बघत बसा मुद्रा ! माझ्याजवळ नाहीं वेळ ! उठवा त्याला ! नाहींतर माझ्या केरसुणीचा सपाटा बसेल त्याच्या पाठींत ! "

जगन्नाथ उठून बसला. त्याची तेजस्वी मुद्रा पाहून पुजारणीची केरसुणी जागींच राहिली.

पुजारी म्हणाला,

" चारी, कुठले आपण ? "

" मुनूगुंड्डचा "

" अय्योय्यो ! हें मुनूगुंड्ड ! जवळ इथून ! आपलें कुल कोणतें ? "

" ब्राह्मण ! पेरुभट्ट माझे वडील ! "

" जगन्नाथ आपलें नाव ? "

" होय ! "

" रंगण्णाची आई ! ये लवकर ! नमस्कार कर ! अगे, हे फार विद्वान् ब्राह्मण ! " पुजारी धावपळ करीत म्हणाला. रंगण्णाच्या आईनें केरसुणी खालीं टाकली, आणि नमस्कार केला.

ती म्हणाली,

" मुला ! रागाऊं नकोस बरें का ! तुला केरसुणी मारायला निघाल्यें होत्यें—"

पुजारी घाईघाईनें बोलला,

" रंगण्णाची आई, जगन्नाथ पंडित फार विद्वान् ब्राह्मण ! तिनुवेल्लीला सकल दाक्षिणात्य पंडिताची सभा जिंकून सोडली ! चारी, निघाले कुठे ? "

" उत्तरेंत ! "

" उत्तरेंत ? " आश्चर्यानें पुजारी म्हणाला, " अशा धामधुमींत ? चारी, उत्तरेंत यवनांचा प्रादुर्भाव झाला ! भ्रष्ट ! चाण्डाळ ! त्याच्यात जाऊन—"

" माझ्या सामर्थ्यांवर माझा दृढ विश्वास आहे ! माझी खात्री आहे, कीं केवळ भ्रष्ट चांडाळच काय, पण प्रत्यक्ष पंचमहापातकी राक्षस जरी समोर प्रतिद्वंद्वी म्हणून आले, तरी तेहि माझ्या काव्यसामर्थ्यानें भुलून माझ्या पायतळीं लोटांगणें घालतील ! यवन काय माणसें नाहींत ? त्याना काय भावना नाहींत ? भावनेचा लवलेशहि ज्याच्या अंगीं धुगधुगतो आहे, त्याच्या अंगीं मी नवचेतना निर्माण करीन ! त्याचें जीवन रसमय करून टाकीन ! माझ्या वाणींत सुप्त ओज आहे ! तिच्या अगीं अलौकिक सृजनसामर्थ्य दडलेलें आहे !

" रामकृष्णांच्या क्रीडाभूमींत जाऊन ती शांतरसानें अभिनिवेल ! शृंगारानें सुगंधित होईल ! करुणेनें पाझरून वाहू लागेल ! त्या ओघा-बरोबर यवनाचा यावनीभाव विरघळून जाऊन तेहि माझ्या कवितेशीं तद्रूप होऊ शकतील ! "

" जा चारी ! तुम्हाला कोणी अडवू शकत नाहीं ! " पुजारी श्रद्धेनें विगलित होऊन म्हणाला.

" जा कुठें ? तुम्हीहि खूप आहात ! एवढा विद्वान् ब्राह्मण माझ्या घरीं आला, त्याला मी तसाच धाडू परत ? "

" मग काय करत्येस ? "

" तुम्ही त्याना स्नानाला घेऊन जा. तोंपर्यंत मी स्वयंपाक करत्यें ! "

जगन्नाथाला रहावे लागलें. स्नान झाल्यावर पुजारिणीनें आग्रह करकरून त्याला जेवूं घातलें.

दुपारीं ऊन्ह उतरल्यावर जगन्नाथ निघाला. पुजारीण दाराआडून म्हणाली,

" चारी ! मेलें माझें तोंड फाटकें आहे ! काय बोलले तें विसरून जा बरें का ! "

गद्गद स्वरात जगन्नाथ म्हणाला,

" अम्मा ! वर कठीण असलेल्या नारळाच्या पोटीं अमृतासारखें पाणी साठविलेलें असतें, हें मी विसरलों नाहीं ! हा माझ्या उत्तरयात्रेचा पहिला दिवस ! आज तुम्हीं मला अत्यत आदरानें जेवू घातलेंत ! हे तुमचे उपकार मी जन्मजन्मातरीं विसरणार नाहीं ! "

तिला नमस्कार करून जगन्नाथ पुजाऱ्याबरोबर बाहेर पडला. उत्तरेच्या दिशेनें काहीं अतर चालून गेल्यावर त्यानें पुजाऱ्यास थाबविले, आणि तो पुढें निघाला.

यात्रा सुरू झाली.

रोज तो चालवेल तेवढें अतर चाले. वाटेंत त्याला अनेकदा घामेजलेल्या घोड्यावरून भाले सावरीत धावणारे स्वार भेटत. कधीं भयाकुल गावकरी त्याला प्रवेश नाकारून गावच्या वेशीचीं दारें लावून घेत. एक-दोनदा त्याला लुटारूंच्या झुंडीसहि तोंड द्यावें लागलें.

पण जगन्नाथाच्या काव्यसाधनेवर यापैकीं एकाहि अडथळ्याचा यत्किंचित् परिणाम झाला नाहीं. त्याच्या समाधींतून त्याला खालीं उतरविणें यापैकीं कुणासहि शक्य झालें नाहीं.

मार्गानें चालताना त्याला एखादे कमळांनीं भरलेलें सरोवर लागे.

त्यात प्रफुल्लपणें डोलणाऱ्या एखाद्या कमलावरून बगळ्याची झुंड त्याच्याकडे ढुंकूनहि न पहातां सोंसावत पुढें निघून जाई.

जगन्नाथाला वाटे, कमलाला दुःख झालें आहे !

तो तिथेच थाबे. त्या कमलाच्या जवळ जाता येईल तितकें जाऊन तो त्याला म्हणे,

" अरविंदा ! आसवे गाळूं नकोस !

" या मूर्ख बगळ्याना तुझे मूल्य माहीत नाहीं—

" नसेना का !

" तुझ्या परागावरून आपल्या जीवाचें लिंबलोण करणारे भ्रमर अजून जिवन्त आहेत ! "

कमलिनि मलिनीकरोषि चेतः ।
किमिति बकैरवहेलितानभिज्ञैः ॥
परिणतमकरन्दमार्मिकास्ते ।
जगति भवन्तु चिरायुषो मिलिन्दाः ॥

एखादें चन्दनाचें झाड पाहून तो म्हणे,

" मित्रा चन्दना, तूं धन्य आहेस !

" तुझ्याबरोबर स्पर्धा करूं शकेल, असा जीव अजून जन्माला यायचा आहे.

" उगाळला जात असतांहि तूं सज्जनाच्या चित्तास संतोष देतोस !

" तुझ्यासारखा मी होईन का ? "

पाटीर तव पटीयान्
कः परिपाटीमिमामुरीकर्तुम् ।
यत् पिषतामपि नृणाम्
पिष्टोऽपि तनोषि परिमलैः पुष्टिम् ॥

नाना तीर्थांची शोभा पहात तो नाशिकाच्या पंचवटींत येऊन गोदा-तीरीं उतरला. गोदेच्या बुद्बुदानीं सुशोभित असणाऱ्या जलाकडे पाहून तो अति संतुष्ट झाला. स्नान करीत असलेला एक संन्यासी त्याची तदाकार वृत्ति पाहून त्याला म्हणाला,

" उत्तरेंत निघालास ? "

" होय ! "

" मघापासून मी तुझी रसवृत्ति पहातों आहें. मी सांगतों तिकडे जाशील ? "

" कुठे ? "

" शूर राजपुतांच्या देशांत ! जयपुरला. जिथें एका कवितेवरून राज्य ओवाळून टाकणारे राजे राहतात, तिथें ! तुझ्या अंगीं विद्वत्ता असेल, तर तिथें तिचें योग्य मोल होईल. तू ज्योतिषशास्त्रपारगत असशील, तर तिथें सगळ्या अम्बराचा शोध घेण्यापुरते स्वास्थ्य तुला लाभेल. कविता तुझें घर पुसत आली असेल, तर त्या शूरांच्या देशात तिला चेतना प्राप्त होईल. मग जाशील तिथें ? "

" हो ! जाईन ! " भावमग्न नेत्रानीं असीम क्षितिजाकडे पहात जगन्नाथ म्हणाला.



## ४.

" गुरुजी ! उद्या अनध्याय ना ? "

" का हो ? "

" उद्या पौर्णिमा ! "

" पौर्णिमा का उद्या ? तर मग उद्यां आणि परवाहि. "

" परवाहि ? ह्यात्तिच्या ! म्हणजे हें सूत्र आतां तेरवा संपणार ! "

" सपेना का ? अन् तेरवाहि सपेल कीं नाहीं कोण जाणे ! "

" का गुरुजी ? "

" अहो, आत्ताशी तर कुठें एका पक्षाचें म्हणणें सागितलें. या मताचें खडण करणारे पूर्वपक्षी काहीं कमी नाहींत ! त्याचे पूर्वपक्षहि अगदीं तर्कावर सुप्रतिष्ठित वाटतात ! इद्रजाल असतें ना मत्रिकाचें ? तसे. किंवा घटोत्कचाच्या मायाबाजारासारखे. साधासुधा, लेचापेंचा तर अगदीं हुरळून जायचा. "

" हे पूर्वपक्षी कोण गुरुजी ? "

" आतां नांवें कितीक सागू ? जयदेव मित्र, पक्षधर गौड, सत्यानंद, दुर्गोपाध्याय, भीमाचार्य, सुबधु—"

" एक विचारू का गुरुजी ? "

" विचारा कीं ! "

" या सगळ्या पूर्वपक्षीयाचें म्हणणें तुम्हाला माहीत आहे ? "

हंसून जगन्नाथ म्हणाला,

" केवळ पूर्वपक्षीयच नव्हे ! तर या सगळ्याचें यथोचित खण्डण करणारे सत्यव्रत, बलरामाचार्य, कृष्णकान्त, अर्जुनदेव मित्र, वासुदेव गौड, हरभट, हरिहर प्रपन्न, दिगताविजय, पण्डित नरेन्द्र--"

जगन्नाथ कदाचित् आणखी दहावीस नावें घेता. पण त्याच्याकडे आदरमिश्रित आश्चर्यानें पहात अष्टाध्यायी गुडाळून ठेवणाऱ्या त्या विद्यार्थ्यानें पटकन् पोथी खालीं ठेवली, आणि उठून जगन्नाथाला साष्टांग नमस्कार घातला. इतर सर्व विद्यार्थी तें त्याचे कृत्य पाहून तोंडातल्या तोंडात हंसूं लागले.

तो विद्यार्थी जगन्नाथाच्या पाठशाळेत व्याकरण शिकायला येई, म्हणून केवळ त्याला विद्यार्थी म्हणायचें. एऱ्हवीं त्याच्या ओठावरील पाचुदाभर मिशात एखादा दुसराच काळा केंस दिसायचा ! बाकी सगळी पाढरी वसलेली ! जगन्नाथाच्या पाठशाळेची कीर्ति ऐकून त्याला म्हातारपणाच्या पहिल्या पायरीवर उभें राहिल्यावर मग व्याकरण शिकायची बुद्धि निर्माण झाली !

इतर विद्यार्थी कुजबुजत,

" छे ! हा गुरुजींच्या अमोल काळाचा अपव्यय आहे ! "

" नाहींतर काय ? आता म्हातारपणीं व्याकरण शिकून हा कुठे तरवार चालवायला जाणार आहे ? "

" अरे, चार पोर आहेत याला—"

" अन् तीन पोरी—"

" पत्नी पुनः सगर्भा--"

" चूप बसा रे ? आपल्याला काय करायचय् त्याच्या संततीची चौकशी करून ? "

" पण एवढ्या म्हातारपणीं--"

" तो शिकणार, गुरुजी त्याला शिकविणार ! तुमचीं पोटें का दुखतात ? "

" आमचीं पोटें कशाला दुखतील ? पण तेवढ्या वेळात-"

" होऽऽ ! गुरुजी तेवढ्या वेळात आणखी पन्नास विद्यार्थ्यांना-"

" हे: ! हे काहीतरीच बोलतो आहेस तू ! "

" कमींत कमी दहावीस तरी—"

" असूं दे रे ! गुरुजी इकडे येताहेत ! "

अन् मग ती चर्चा थाबे. कधीं कधीं यातला कांहीं भाग त्या म्हाताऱ्या विद्यार्थ्यांच्या कानावर जाई. तो डोळ्यात आसवें आणून म्हणे,

" होय पोरानो ! बरोबर आहे तुमचें ! तुम्हाला वाटते, गुरुजींचा जेवढा अधिक वेळ आपल्याला मिळेल, तेवढे आपण अधिक भाग्यशाली ! मलाहि तुमचीं मनें उमजतात; पण लहानपणापासून या राजपुतान्यातील सगळ्या पाठशाळा धुडाळल्या रे मीं ! व्याकरण शिकायचा जबर छंद ! मला नाहीं वाटत एकहि पाठशाळा मीं वगळली असेल ! उदेपूर, बिकानेर, अहिलवाड, सिद्धपूर, पट्टणगड––अगदीं सगळ्या पाठशाळांचे उबरठे झिजवले ! आपल्या या जयपुरातल्याहि सगळ्या पाठशाळांच्या आचार्यांच्या पायावर डोके घासून घासून हें बघा, टेंगूळ आले आहे केवढे थोरलें ! "

खरोखरीच त्याच्या डोक्यावर टेंगूळ होते. विद्यार्थी कुतूहलाने तें बघत, आणि मग फिसफिसपासून सातमजलीपर्यंत सगळ्या हंसण्याच्या प्रकारांची आवृत्ति होऊन जाई.

" हंसताय् तुम्ही ? हंसा ! पण लक्षात ठेवा, कीं पंडितराज जगन्नाथ इथे येऊन पाठशाळा सुरू न करते अन् माझ्या वार्धक्याकडे दुर्लक्ष करून मला शिकवायचे कबूल न करते, तर माझी ही इच्छा या जन्मीं कांहीं पुरी झाली नसती ! आणि मग इथून पुढे राजपुतान्यात कोणीहि व्याकरण शिकू शकला नसता ! "

" का ? "

" का ? मी भूत झालो असतो ! "

" भूत ? "

" हो ! ब्रह्मराक्षस ! आणि मग व्याकरणाच्या पाठाला प्रारंभ होताच या सगळ्या पंडितांचीं अन् विद्यार्थ्यांचीं टाळकीं मीं एकमेकावर आपटलीं असतीं ! "

पुन: एकदां हंशाचा गदारोळ उडे. त्यांचें तें हंसू थांबवीत तो वृद्ध विद्यार्थी म्हणे,

" तर पण्डितराज जगन्नाथ इथें आले. महारावळांनीं त्याची कीर्ति ऐकली. त्यांना जयपुरला थांबायची विनंती केली. त्यानींहि ती मान्य करून पाठशाळा सुरू केली. अन् मी प्रार्थना करताच मला व्याकरण शिकविणे सुरू करून येथपर्यंत आणून पोचविले ! जन्मजन्मातरीं तरी फिटतील का त्याचे उपकार ? "

एवढ्यात जगन्नाथ तिथें येई, आणि ती चर्चा बंद होई. सगळे विद्यार्थी तोंडांतल्या तोंडात हंसत आणि पागत.

आजहि त्या म्हाताऱ्यानें जेव्हा विद्यार्थ्यांचें हंसणें पाहिलें, तेव्हा उठून अंग झाडीत तो म्हणाला,

"हंसताय् तुम्ही ? अरे, या दोन्ही पक्षाचीं मतें तर राहूंच दे, पण याचीं नांवें तरी पाठ असलेला कोणी बृहस्पति पाहिला होतात कां तुम्हीं कधीं ?"

तोंच समोर पहात जगन्नाथ उठून उभा राहिला. विद्यार्थ्यांनीं ओळखलें कीं, पण्डित सुखलाल आले आहेत. भराभर आपापल्या पोथ्या गुंडाळून ते उठले.

जगन्नाथ सुखलालाना सामोरा जाताच हंसून " अजी नहीं नहीं ! " असें काहींतरी बोलत सुखलालानीं जगन्नाथाला कडकडून मिठी मारली, आणि नतर दोघे एकमेकाना घेऊन आसनाजवळ आले.

" तुम्ही बसा इथें. "

" नाहीं ! तुम्ही बसा ! "

" छे हो ! तुम्ही बसा !

" नाहीं नाहीं, तुम्ही बसा !

" छे छे ! मी काय बसतोंय् ? "

" मग मीहि नाहीं बसायचा ! "

दोघेहि आसन रिकामें सोडून जमिनीवर बसले, आणि क्षणभरानें अकृत्रिम हास्यानें सारी पाठशाळा निनादून टाकीत दोघेहि उठून अर्ध्या अर्ध्या आसनावर बसले.

पण्डित सुखलाल हे राजगुरु. महारावळजींच्या दरबारांत पहिला टिका लावायचा मान सुखलालजींचा. त्याना नमस्कार करून त्याचा आशीर्वाद घेतल्याशिवाय महारावळजी सिंहासनाच्या पायरीला कांहीं पाय लावायचे नाहींत. त्यामुळे सारें जयपूर त्याना उरींशिरीं वागवी.

एकदां पण्डित सुखलालजी जयतालाच्या पाळीवर बसून सायंसंध्या करीत होते, तों त्यांना आपल्या पलीकडे एक सावळया वर्णाचा, गहिऱ्या डोळ्यांचा तरुण एका कमलपुष्पावर दृष्टि खिळून बसलेला दिसला.

वाऱ्याच्या झुळकीनें कमल हाललें, डोललें.

तो तरुण एकदम बोलला,

" कमला ! ओळखलेंस याला ?

" हा तुझा निरपेक्ष मित्र !

" भृंगसमूह तुझ्यावर रुंजी घालतो !

" परागसमूहातून खालीं गळणाऱ्या मधुर मधुरसावर आकृष्ट होऊन !

" तुला वाटते, हेच आपले हितैषी !

" पण हा वायु—

" तुझे पराग, मधुरस, सुगंध, कमनीय रूप यापैकीं एकाचाहि लोभ न करता ही सर्व संपत्ति चहूं दिशांना वाटणारा तुझा निरलस सखा !"

अयि दलदरविन्द स्यन्दमानं मरन्दं
तव किमपि लिहन्तो मञ्जु गुञ्जन्तु भृंगाः ।
दिशि दिशि निरपेक्षस्तावकीनं विवृण्वन्
परिमलमयमन्यो बान्धवो गन्धवाहः ॥

त्या तरुणाच्या मुखातून हा श्लोक बाहेर पडतांच सुखलालजी चमकले. ते लगेच उठले, आणि त्या तरुणाजवळ जाऊन म्हणाले,

"आपण मला क्षमा कराल, तर एक प्रश्न विचारणार आहे आपल्याला."

" विचारा कीं ! "

" हा जो श्लोक आपण म्हटलांत, याचा रचविता कोण ? "

काहीं क्षण तो तरुण गोंधळला, आणि नंतर अत्यंत निर्मल हंसूं हंसून तो म्हणाला,

" कुणी नाहीं ! "

" म्हणजे ? "

" म्हणजे मींच रचला तो ! "

" आपण रचलात ? केव्हा ? किती दिवस झाले ? "

" दिवस ? दिवस नाहीं झाले !

" मग ? "

" आताच रचला नव्हे का ? "

आश्चर्याच्या पहिल्या लोंढ्यातून बाहेर पडल्यावर सुखलालजी म्हणाले,

" आपलें नाव काय ? "

" जगन्नाथ ! "

" नव्हे ! "

" मग ? "

" पण्डितराज जगन्नाथ ! "

पण्डित सुखलालजींनीं हर्षनिर्भर होऊन जगन्नाथास मिठी मारली. परिचयाचें रूपातर झालें स्नेहात आणि स्नेहाचा परिपाक महारावळजींनीं जगन्नाथाला अत्यंत आदराने आपल्या दरबारात स्थान देण्यात. महारावळ-जींच्या विनंतीवरूनच जगन्नाथानें सराफ्याच्या कोंपऱ्यावरील विस्तीर्ण इमारतींत आपली पाठशाळा सुरू केली होती.

बहुधा रोज सुखलालजी जगन्नाथास भेटायला येत, आजहि ते आले होते; पण आज येताना एक मजेदार सकल्प करीत ते वाट चालत होते.

हंशाचा भर ओसरल्यावर सुखलालजी अकृत्रिम स्नेहभावानें जगन्नाथाचा हात दाबीत म्हणाले,

" पण्डितराज ! उद्या पौर्णिमा ! "

" नव्हे ! आजच ! "

" आज ? आज कशी ? उद्या ! पंचागात तर—"

" पण पंचागाचा दाखला हवा कशाला? प्रत्यक्ष प्रमाणाने सिद्ध झालेली पौर्णिमा आजच आहे ! "

काहीं न कळून सुखलालजी जगन्नाथाच्या मुद्रेकडे बघत राहिले. गंभीरपणा कायम ठेवायची धडपड करीत जगन्नाथ म्हणाला,

" पण हेंहि नव्हे ! आजच काय, रोजच पौर्णिमा असते माझ्यासाठीं ! जेव्हा या पाठशालारूपी आकाशात सुहृद्रूप पूर्णचद्राचा उदय होतो--"

पुनः एकदा हास्यध्वनीने वातावरण रगलें.

" अनर्थ होईल बरें का ! पण्डितराज, वयानें माझ्यापेक्षा लहान असूनहि तुम्हाला चन्द्राच्या जनकाची, सागराची उपमा आपणाकडे घ्यावी लागेल ! सागर पौर्णिमेस लहरी भरभरून वर झोंकतो, आपल्या लेकराला भेटायला ! अहात तयार सागर व्हायला ? "

" नको नको ! त्यापेक्षा मला चन्द्रकान्तमणि होणें परवडेल ! "

" तर मग उद्या पौर्णिमा हे मान्य करा ! "

" मान्य ! "

" जयसागराच्या पलिकडील तटाकावर जयेश्वराचे मदिर आहे. तिथें उद्या सकाळीं जायचें. तुम्ही, मी, आमची मुलगी, तिची आई--! दिवसभर तिथे राहू ! रात्रीं परत येऊ, बैलगाडींतून. "

दुसरे दिवशीं सकाळीं बैलगाडी जयसागराकडे जावयास निघाली.

" पण्डितराज, बसा कीं ! "

" नको सुखलालजी, पायीं चालू आपण ! "

" पण गाडींत जागा आहे ! "

" तरी पायींच जाऊं. सकाळच्या वेळीं पायीं चालण्यात जो आनंद आहे--"

दोघेहि पायीं गाडीच्या मागोमाग निघाले.

तोंडावर घूघट घेऊन डोईवर स्वच्छ घासलेल्या पाण्याच्या घागरी घेतलेल्या भामिनी रस्त्यानें चालल्या होत्या. त्याच्यामागें हातीं नकेल घेऊन चालणाऱ्या आपल्या मालकापाठोपाठ लाब लाब ढागा टाकीत, आळसावलेल्या डोळ्यानीं इकडे तिकडे पहात काहीं उंट वाटचाल करीत होते.

हनुवटीखालून दुतर्फा दाढी वळविलेला एक पंचहत्यारी राजपूत आपला घोडा उधळीत गाडीशेजारून गेला.

जगन्नाथ स्तिमित नेत्रांनीं हें सर्व दृश्य पहात चालला होता. तो कोणाशीं कांहीं बोलत नव्हता, बोलण्याच्या मनःस्थितींतहि नव्हता. जयसागराच्या काठानें गजगतीने चालणाऱ्या त्या राजपूत रमणी, ते उंट, तो घोडेस्वार या सर्व दृश्यानें त्याला इहलोकातून उचलून गंधर्व–नगरात हेलकावून दिलें.

त्याला वाटत होतें, या राजपूत रमणी नाहींत, अप्सरा आहेत !

हे आळसावलेले उंट नाहींत, मदमत्त दिग्गज आहेत !

" बब्बा ! "

दचक्यानें तो शुद्धीवर येऊन पाहूं लागला.

दुतर्फा पडदा लावलेल्या गाडींतून एक गोजिरवाणी मुद्रा बाहेर येऊन आसुसलेल्या डोळ्यांनीं सुखलालजींकडे पहात होती.

दुर्गाम्बा !

होय. दुर्गाम्बा आणि ही गोजिरवाणी बाळी या दोघींत विलक्षण साम्य होतें !

" बब्बा ! " पुनः त्या मुलीनें हाक मारली.

" क्या कहती है बेटी ! "

" मी पायीं चालत्यें ! "

" नको बेटी ! गाडींत बैस मॉजवळ. "

" नाहीं ! तुमच्याबरोबर चालत्यें ! "

" अग नकोऽ ! अंः ! नाहींच ऐकायची ! हळू ! हळू ! सावकाश उडी मार ! "

पोरीच्या मागोमाग तिची बकोटी धरून एक गोरा, नितळ हात बुरख्यातून बाहेर आला, आणि पोरीला उतरवून लगेच अदृश्य झाला. धांवत धावत पोर येऊन सुखलालाच्या अंगास लोंबकळली.

" अरी हा हा बिटियारानी ! मी पडेन ना ! " असें म्हणत आपल्या मुलीचें कौतुक सागण्यासाठीं म्हणून सुखलाल जगन्नाथाकडे वळले––

तो अनिमिष नेत्रानीं कावराबावरा होऊन पोरीकडे पहात होता !

" का हो ? "

उत्तर नाहीं.

" पण्डितराजजी ! "

" अं ! काय ? मला म्हणतांय् कांहीं ? "

" हो ना ! पहाताय् काय हिच्याकडे ? "

" तुमची ही मुलगी—"

" हो ! दुर्गेश्वरी इचें नाव--"

" आश्चर्य ! "

खळकन् जगन्नाथाच्या डोळ्यातून दोन आसवें खालीं ओघळलीं आणि अत्यंत वेगाने पुढें होऊन त्यानें दुर्गेश्वरीला उचलून घेतले. घट्ट मिठी मारून तो तिच्या गालाचीं चुंबनांवर चुंबनें घेऊं लागला. मुलगीहि त्याच्या कुशींत विसावली.

आश्चर्यानें दिङ्मूढ होऊन त्या दोघाकडे पहात असलेले सुखलाल म्हणाले,

" बिटियारानी ! "

" बब्बा ! "

" याना ओळखतेस तूं ? "

" हो ! "

" कोण ? साग बघूं ? "

" काका ! "

" पण्डितराज ! मी तर थक्क झालो आहें ! "

" का ?

" आता काय सागूं तुम्हाला ? आजपर्यंत कुणाहि नवख्या माणसा-जवळ न गेलेली ही पोर तुम्हाला एकदम चिकटली—"

" त्यांत आश्चर्य काहीं नाहीं ! "

" वा: ! आश्चर्य नाही ? "

" मुळींच नाहीं ! "

" का ? "

" ही माझी बहीण आहे ! "

" बहीण ? "

" होय ! माझी धाकटी बहीण ! दुर्गाम्बा ! "

" दुर्गाम्बा ? "

" होय ! दुर्गाम्बा ! आज खूप दिवसानीं भेटली ! खूप दिवसानीं ! अचानक ! कल्पनातीत रीतीने ! किती आतुर झालो होतो मी ! किती उत्सुक ! असें वाटे, कीं आता कधीं भेट होत्येय् कोण जाणे ! कदाचित् कधींच भेटणार नाहीं !

" पण अचानक ती भेटली ! वाटच पहात होती ती माझी ! नव्हे, माझ्या भेटीसाठीं तिचा जीव जणूं आसुसला होता !

" ती मला येऊन बिलगली ! तुम्हाला आश्चर्य वाटलें ! पण मला मात्र ती न चिकटती, तर आश्चर्य वाटते !

" ती माझी आहे ! माझी ! "

पुन: जगन्नाथानें दुर्गेश्वरीवर चुम्बनाचा वर्षाव केला. त्यानतर जयेश्वराला पोंचेपर्यंत त्याने तिला खालीं उतरविलें नाहीं. विमनस्कपणें तिला बळेबळें खाद्यावर बसवून तो चालत राहिला.

जयसागराच्या चहूं बाजूनीं कुरुंदाच्या दगडाची विस्तीर्ण पाळ बाधली होती. जयेश्वराजवळ त्या पाळीला तोंड पाडून भला प्रचंड घाट उभा राहिला होता. वेल, चिंच, पिंपळ इत्यादि मोठमोठे वृक्ष जयेश्वरावर सावली धरून उभे होते.

एका चिंचेखालीं गाडी उभी राहिली. भराभर सामान खालीं काढलें गेलें. सुखलाल अगोछा उचलीत म्हणाले,

" ऐकलेंत काय दुर्गेश्वरीची मॉ ! आम्ही आता स्नानें उरकतों. "

" पण आपण इथें जेवायला आलों आहोंत, हें स्मरणात असूं द्या ! "

" म्हणजे ? "

" म्हणजे काहीं नाहीं ! जयसागरात कमळे आहेत. त्याच्यावर भृंगसमूह गुंजारव करीत असेल. कदाचित् आकाशात काहीं हंसहि असतील.

पलीकडील तटाकावर काहीं स्त्रिया पाणी भरीत असतील. मला वाटतें, कविराजाना एवढे असलें, कीं मग भुकेचें स्मरण राहाणार नाहीं! आणि तुम्हालाहि काहीं वेगळ्या पंक्तीला जेवायला वाढावेंसें मला वाटत नाहीं!"

पुढें दुर्गेश्वरीची आई काय म्हणाली, तें काहीं सुखलालाच्या हसण्याच्या गदारोळात कुणाला ऐकूं गेले नाहीं.

स्नानें झालीं. मंडळी जेवायला बसली. दुर्गेश्वरीच्या आईनें मोठ्या आपुलकीनें चूर्म्यांचे लाडू केले होते. तन्मयतेनें दोन थाळे सजवून तिनें दोघासमोर माडले.

सुखलालजी मोठ्या रसिकतेनें प्रत्येक पदार्थांची वानवानून स्तुति करीत जेवूं लागले. दुर्गेश्वरीच्या आईनें आग्रह करकरून दोन्ही थाळ्यातून खाद्यपदार्थांचे ढीग रचले.

पण काहीं वेळानें जगन्नाथ काहीं बोलत नसून जेवणांतहि त्याचें मोठेंसें लक्ष नाहीं, हें सुखलालजींच्या ध्यानीं आले. लगेच हात आवरता घेऊन ते म्हणाले,

"काय हो पण्डितराज, स्वयंपाक आवडला नाहीं काय?"

"अं? हो! आवडला कीं!"

"मग? जेवत का नाहीं?"

"जेवतों कीं!"

पुन: दोन चार घांस घेऊन जेव्हा जगन्नाथाने हात आखडला, तेव्हां सुखलाल म्हणाले,

"ऊंहूं! तुम्हाला काहीं भोजनात रुचि नाहींसें दिसतें!"

"वा वा! नाहीं कशी? भरपूर रुचि आहे. मी जेवतो आहें!"

"कुठें जेवताहात?"

एक उसासा सोडून जगन्नाथ एकदम म्हणाला,

"हें पहा पण्डितजी, स्वयपाक अति उत्तम झाला आहे! त्यात नांवं ठेवायला एवढीशीहि जागा नाहीं—"

"मग तुम्ही जेवत का नाहीं? घरची आठवण झाली का?" घूंघट

उगीच थोडासा चाळवीत दुर्गेश्वरीच्या आईनें मायेने माखल्या स्वरात प्रश्न केला.

एकदम जगन्नाथाच्या डोळ्यात मेघ वोळले. डोळे पुसायची धडपड न करता तो म्हणाला,

" पण्डितजी, भाभीजी, मघा दुर्गेश्वरीच्या रूपानें मला माझी दुर्गाम्बा भेटली—

" आणि तिनें मला हलवून जागें केले !

" मी उत्तरेत आलो--

" तो काय एका गावीं पाठशाळा सुरू करून विद्यार्थ्यांना वृद्धिरादैच् शिकवीत बसण्यासाठीं ?

" हें तर मला दक्षिणेंतहि सहजशक्य होते !

" नव्हे, माझ्या वडिलाची मिरास होती ती !

" पण मला तें रुचलें नाहीं !

" कालिदास-भवभूतींच्या सृष्टींत स्वच्छंद विहार करणारा माझा मानसहंस —

" तो काय या बारक्या मासोळ्याची शिकार करण्यात धन्यता मानील ?

" बंधनाचा गोवा उकलून तो उडाला !

" असीम आकाशात—

" मेघाशीं गोष्टी बोलत--

" गंधर्वनगरांतील अप्सराशीं शिवाशिवी खेळत--

" कल्पतरूच्या उद्यानात स्वच्छंद क्रीडा करीत--

" सृजनाच्या मदानें उन्मत्त झालेला--

" सगर्भा नवयुवतीच्या नेत्रातील मादकता ल्यालेला--

" उमलत्या बीजाची नव्हाळी पिऊन जन्मास आलेला--

" वसन्तातील नवपल्लवांच्या गर्भांत त्यांच्याबरोबर नवजीवनाचीं स्वप्नें पहात असलेला--

" असा माझा तो मानसहंस काय जयपूरच्या पाठशाळेच्या प्रलोभनानें अडकून पडेल ?

" मीं दुर्गाम्बेला कबूल केलें आहे--

" माझ्या प्रतिभेनें त्रिभुवन जिंकून मी तें तिला खेळायला देईन—

" आज दुर्गेश्वरीच्या रूपात मला भेटून तिनें माझ्या संकल्पाची स्मृति पुनः जागी केली !

" मला जयपूर सोडायला हवे--! "

थक्क झालेले सुखलाल म्हणाले.

" मग कुठें जाणार तुम्ही ? "

" दिल्लीला-नव्हे, हस्तिनापुराला ! पाडवाची ती राजधानी आहे ! माझ्या काव्यचातुरीने ती मी जिंकीन, आणि मग तो करभार नेऊन गोकुळांत श्यामसुंदराच्या पायांवर ओतीन ! "

" पण पण्डितराज ! दिल्लीला म्लेच्छ पातशहा राज्य करीत आहे ! त्याच्या कारकीर्दींत देववाणीला बटकीची कळा आली, फारसी राणीपदावर आरूढ झाली--"

" मी देववाणीच्या साहाय्यार्थ धावून जाईन ! फारसीचा हात धरून मी तिच्या सिंहासनावर चढेन, आणि मग फारसीला काव्यनगरींतील साम्राज्ञीपदाच्या स्थानावरून पदच्युत करून पुनः एकदा देववाणीला पट्टाभिषेक करीन ! "

" पण त्यासाठीं तुम्हांला फारसीचें अध्ययन करावें लागेल ! "

" पेरुभट्टाच्या मुलाला जगातील एकहि वस्तु अप्राप्य नसली पाहिजे ! अष्टाध्यायीचे पठन एक मासात परिपूर्ण करणारास फारसी कोण्या झाडाचा पाला ? "

आश्चर्यमग्न सुखलालजी जगन्नाथाच्या तोंडाकडे पहात राहिले !



# ५.

दिवाण-ई-आममध्यें आज मुंगी शिरूं म्हणेल तर तिला वाव नव्हता.

शहेनशाह शहाजहॉं यायला अजून बराच वेळ होता, तरी सगळा दरबार खच्चून भरलेला होता.

कारण तसेंच होतें.

आज स्वत: शहेनशाह एका भांडणाचा निर्णय देणार होते.

बर्बर पठाणांच्या राजवटींत अनेकदां भरडून निघालेल्या दिल्लीला श्वास टाकायपुरती उसन्त मिळाली शहाजहॉं तिथें नांदूं लागल्यावर. शहेनशाह देखणे होते, उमदे होते आणि खानदानी घराण्यात जन्म झाला असल्यामुळें परधर्मसहिष्णुताहि त्याच्या अंगीं नावाजण्याजोगीच होती.

मेवाडाधिपतीशीं शेवटची झुंज झुंजत असतां बाबरानें अल्लाजवळ दुवा मागून इथून पुढें शराबच्या थेंबालाहि स्पर्श करणार नाहीं अशी कसम खाल्ली होती. तेव्हापासून त्यानें तें व्रत पाळलें होतें.

आपल्या पूर्वजाच्या या नेकीचा परिणाम शहाजहॉंवरहि झालेला होता, म्हणूनच आज दरबारांत एवढी रेटारेटी झाली होती.

भाडणाचें स्वरूप कांहींसें गुंतागुंतीचें होतें.

सुलेमानी चौकात खिलजी घराण्याच्या राजवटींत एक टोलेजंग मशीद उभारली गेली होती, तिच्या नेमकें समोर एक हनुमानजीचें देऊळ होतें.

तसें पाहिलें तर बांधणुकीच्या दृष्टीनें त्या दोन स्थानांत कांहीं फारसें साम्य नव्हते.

अल्लाउद्दीन खिलजीच्या दिवाणानें राजपुतान्यातून पाढरा फेक संगमर्मर उंटांच्या पाठीवर लादून आणला. त्यांतला निम्मा त्यानें आपली कब्र बाधण्यात खर्च केला, निम्मा या मशिदींत. आकाशाला स्पर्श करून मेघांची वार्ता पुसतील, असे उत्तुंग मीनार त्या मशिदीच्या पुढील अंगास उभे होते. इमाम नमाज पढायला बसे, ती जागा तर अशी देखणी होती, कीं दिवाण-ई-खासनें त्या शोभेपुढें तोंडात बोट घालून बसावें. बांग पुकारण्याचा सज्जाहि म्हणावा असाच होता.

सुलेमानी चौकाकडे माणसाची दृष्टि वळली, कीं एक मैलावरूनहि दिसणारे ते मीनार डौलानें जी प्रौढी सागत, त्यापुढे हनुमानजीच्या देवळाचें रामनामस्मरण कुणाला ऐकूंहि जात नसे.

मशीद संगमर्मरी, तर मंदिर चुनेगच्ची.

मशीद गगनचुंबी, तर मंदिर जेमतेम पुरुषभर उंचीचें.

मशीद अति भव्य, तर मंदिरात नेमकी आठ-दहा भक्तांना मोठ्या मुष्किलीनें विसावता येईल एवढी जागा.

मंदिराच्या या नगण्यपणामुळेच आजपर्यंत तें मंदिर तिथें त्या मशिदी-समोर जगूं शकलें. एऱ्हवीं केव्हाच त्याचे तीन तेरा व्हायचे.

त्या मंदिरात दोन महिन्यांपासून एक म्हातारे बैरागी आणि त्यांच्या-बरोबर एक युवती विरागिनी, अशीं दोघें येऊन राहिलीं. बैरागीबाबानीं आपली धुनी जमवली. विरागिनी माई एकतारीवर गात भिक्षा मागूं लागली.

तिचा कण्ठ अति मधुर होता. एकतारीच्या सुरांत सूर मिसळून जेव्हा ती वैष्णव पदावली गाई, तेव्हा भल्याभल्या नांवाजलेल्या कलावन्तिणींचें दर्दभरें संगीतहि त्यापुढें फिकें वाटूं लागे. गानलुब्ध रसिकाच्या झुंडीच्या झुंडी तिच्यामागें हिंडत आणि तिच्या संगीताच्या स्वरात बेहोष होऊन जात.

ती एका घरासमोर एका पदाहून अधिक गात नसे, आणि रोज पाच घरांहून अधिक भिक्षा मागत नसे. गानलुब्ध तिला आग्रह करीत,

"माई ! आणखी एक पद गा ना !"

" नाहीं भैय्या ! बाबाजींनीं नियम घालून दिला आहे ! "

" काय ? "

" पाच घरापलीकडे भिक्षा मागायची नाहीं, आणि--"

" आणि काय ? "

" आणि एका घरासमोर एका पदापलीकडे कांहीं गायचं नाहीं. "

लोक तिच्यापुढें नाना पदार्थांची रास रचीत. ती त्यातून लागतील तितकेच उचली. कुणीं आग्रह केला, तर हंसून ती म्हणे,

" करायचे काय एवढें ? "

" वा ! वा ! उद्यासाठीं नको ? "

" उद्या हरि देईल. "

" पण हें नेलेंत तर उद्यां पुनः हिंडावें लागणार नाहीं ! "

" त्यानें पाय दिले ते हिंडण्यासाठीं ! "

मग तो माणूस निरुपाय होऊन स्वस्थ बसे.

तिच्या या गानचातुरीची ख्याति जेव्हा दिल्लीच्या अमीरउमरावांनीं ऐकली, तेव्हा त्याच्यांत चर्चा सुरू झाली.

" उफ् ! लाजबाब गात्ये ! "

" अं: ! उगीच काहींतरी ! "

" काहींतरी ? एकदा ऐका म्हणजे कळेल ! "

" होऊं द्या तुमच्या दिवाणखान्यात मैफल, म्हणजे ऐकूं. "

" दिवाणखान्यात ? हु: ! "

" क्यौं जी ? "

" अजी साहब, ती मैफलींत गात नाहीं ! "

" क्यौ ? "

" क्यौ ! आता बसा याना समजावीत ! "

" समजावीत बसण्यापेक्षां तिला खेचून आणाल तर तें अधिक सोईचें होईल ! "

" कोयल गा म्हटल्यावर गात नसते ! "

" पण ही कोयल नाहीं, बुलबुल नाहीं. आम्हीं गा म्हटल्यावर तिनें गाइले पाहिजे."

" ती गाणार नाहीं ! "

" नाहीं ? "

" ऊ हूं ! तुम्हीं तिला ओळखलें नाहीं अजून. आस्मानची बिजली आहे ती. "

" काय करील ? "

" हात जाळील ! "

" मग तुम्ही शेकत बसा ! काय नामर्दासारख्या बाता करतां ? "

" एका बेगुन्हा फकिरनीला जुलमानें ओढून आणून गायला लावणें, ही बहादुरी नव्हे ! "

" बेशक आहे ! दुनिया पैदा झाली, तीच मुळीं बहादुराची खिदमत करण्यासाठीं. ती गायली पाहिजे ! तुमच्या इथें नाहीं तर आमच्या इथे !"

" पहा बरें ! पस्तावाल ! "

" दिलेरखॉंला पस्तावायची सवय नाहीं. "

त्यानंतर तीनच दिवसानीं दिल्लींतील हिंदूंना गदगदा हलवीत बातमी उधळली,

" माईला दिलेरखॉंच्या दुराणी पठाणानीं कैद करून नेलें ! "

हेंच भाडण आज शहाजहॉंच्या पुढें निर्णयासाठीं यायचे होतें.

उत्कंठा शिगेस पोंचली. भावनाची तार टिपेपर्येत चढली. तरुण उमराव मिशावर ताव देऊ लागले. म्हातारे ना धड ही थड, ना धड ती, असे मध्येंच लोबकळत राहिले. हिंदूंची बाजू माडायचें काम राणा जौहरसिंगजींनीं आपल्याकडे घेतलें होतें. तरुण हिंदूना थाबवता थाबवता त्यांच्या तोंडीं फेस आला. रगेलाचे हात वारवार तरवारींच्या मुठीवर आपटूं लागले.

शहेनशहाच्या सिंहासनाच्या बाजूला एका सज्जाला चिकाचे पडदे लावले असून त्याना जाळ्यानीं झाकलेलीं गवाक्षें होतीं. ते पडदेहि वारंवार हलू लागले. त्याच्या आड बसलेल्या शहेजाद्या आणि त्यांच्या सख्या एकमेकींना चिमटे घेत आजच्या निर्णयासंबंधीं पैजा लावीत होत्या.

एक मृगनयना मात्र भयातुर नेत्रांनीं अस्वस्थ होऊन शहेनशहा केव्हा येतात, त्याची वाट पहात बसली होती. शहेजादी सलीमा तिच्याजवळ जाऊन तिला ढोशीत म्हणाली,

" का गे, साग ! ईमान कीं शौक ? "

" म्हणजे ? "

" हिला मेलीला कांहीं कळतच नाहीं ! अगे, तंटा काफरासारखा तुटेल कीं उमरावासारखा ? "

आपलें धडधडणारे हृदय नाजूक बोटांनीं जणू सावरीत ती मृगनयना म्हणाली,

" तुला काय वाटतें ? "

" मला वाटतें, उमरावासारखा देतील अब्बाजान निकाल ! "

" खुदा ! रहम करो ! "

" का गे ? "

" मला बिचाऱ्या बैरागिणीची दया येते ! "

" ऊं: ! दळभद्री मेली ! अब्बाजाननीं साभाळली लहानपणापासून, म्हणून काहीं खानदानी मिजाज अगीं आणता येत नाहीं ! अगे, त्या भिकारणीला एवढी प्रौढी हवी कशाला ? "

" कशाला ? कशाला ! खुदाला ठाऊक ! "

एवढ्यात बाहेर ललकाऱ्या सुरू झाल्या. त्याच्या पाठोपाठ पातशाह शहाजहाँ हातींच्या गुलाबाच्या फुलाचा वास घेत सथ गतीनें येऊन आसनस्थ झाले. मुजरे झडले, उमरावाचीं शिरस्त्राणे घातलेलीं मस्तके लवलीं. शहेनशहांनीं संकेत करताच आपले किनखाबी झगे सळसळवीत उमराव खुरमाड्या घालून खालीं बसले.

राणा जौहरसिंग रुमालाने हात बाधून उभे राहिले, आणि अदबीनें बोलले,

" मिन्नत आरजू शहेनशाह ! "

" बोला जौहरसिंगजी ! "

" शहेनशाह रहेमदिल आहेत ! फरियाद परवरदीगाराच्या कदमां-पर्यंत पोंचली आहे ! हिंदु आणि मुसलमॉ, दोन्ही प्रजा परवरदीगाराचीं लेंकरे ! एका जमातीची एक बेगुन्हा बैरागन केवळ कुणा एकाचें दिल चाहेल तिथें गात नाहीं, यासाठीं त्या एकाने आपले पठाण पाठवून तिला बाधून घेऊन जावें—"

" लेकिन जौहरसिंग, अल्लातालाने दिलेली आवाजी अलम दुनियेचें दिल बहलावण्यासाठीं नाहीं काय ? "

" बेशक हुजूर ! हुजुराची फर्माइश अगदीं दुरुस्त आहे. आणि त्या-प्रमाणें बैरागन रसिकाची मने रिझवीतहि होती. लेकिन मी अर्ज करतो, कीं बुलबुलाचा गळा दाबल्यावर तो गाईल काय ! "

" दुरुस्त आहे तुमची अर्जी—"

" बद्याचा गुन्हा माफ व्हावा हुजूर !" सुलेमानी चौकातील मशिदीचा इमाम हात बांधून म्हणाला.

" काय म्हणणें आहे ? "

" फरियादीचा भला बुरा निकाल शहेनशाह देतील तो आम्ही सरमाथा उचलूं. लेकिन काजीसाहेब काय म्हणतात, तें एकदा ऐकून घ्यायला हवें नाहीं का ? "

" बेशक ! "

तांबड्या दाढीचा, डोळ्यात सुरमा घातलेला, पोवळ्याची माळ चाळवीत असलेला काजी उठून उभा राहिला. त्यानें शहेनशाहाना बदगी केली, आणि प्रौढीनें म्हणाला,

" परवरदीगार, आपल्या कदमाजवळ जी फरियाद माडली गेली, तिचें स्वरूप एवढें साधे नाहीं. आपल्या दोन लेकरातलें हे भाडण नसून ईमानदार आणि काफर यांच्यातली ही झुंज आहे ! काफराचें हें कुफ्र दुरुस्त करण्याचा एकच इलाज ! त्याचा नामोनिशॉ कुठें उरू न देणें ! यातच त्याच्या जिवाची खैरियत आहे !

" बकरीची खैरियत आहे माणसाच्या पोटात पचून खून बनणें ! यांत बकरीच्या जीवनाचें सार्थक आहे—मग तिला काय वाटेल तो रंज होवो.

" एका शायरानें फर्मायश केली आहे,

" **अशरत ए कतरा है दरियामें फना हो जाना !**

" दरियात मिसळून जाणे ही आस्मानातून पडणाऱ्या थेंबाच्या जीवनाची कृतार्थता.

" तेव्हा एका काफर बैरागिनीनें गायलें पाहिजे, ईमानदार चाहेल तिथें गायलें पाहिजे !

" तिच्या खुषी किंवा बेखुषीचा सवालच पैदा होत नाहीं !

" हा कुरानाचा हुक्म आहे ! कुदरती फर्मान आहे हें ! "

डोळे गरागरा फिरवीत जणूं सभा जिंकली अशा थाटात सभेकडे पाहून बंदगी करीत काजी खालीं बसला.

" क्या खूब ! क्या खूब ! " सगळ्या उमरावात मर्मरध्वनि उठला. सगळ्या हिंदु सरदाराचीं तोंडे काळंजलीं.

सज्जात शहेजादी सलीमा मृगनयनेला डिंवचून म्हणाली,

" क्यौ ? जिरली ? "

" खुदा रहेमदिल आहे ! " तोंड दोन्ही हातानीं झाकून घेतलेली मृगनयना म्हणाली.

तोंच खालीं दरबारात गडबड झाली, म्हणून तिनें तोंडावरिल हात काढून खालीं पाहिलें.

पहारेकऱ्याना मागे हटवीत जगन्नाथ दरबारात पुढें घुसत होता !

" कौन है ? शोर क्या है ? " पातशहानीं विचारले.

" शहेनशाह ! कुणी काफर--! "

जगन्नाथ त्वेषाने ओरडला,

" काफर तो, जो रहेमदिलीला पायतळीं चेचतो !

" काफर तो, जो इन्साफाचा गळा घोंटतो !

" काफर तो, जो कुराणाच्या हुकमाविरुद्ध वागण्यात धन्यता मानतो !

" काफर तो—"

" सबूर ! पागल ! " जगन्नाथाचें तोंड दाबीत पहारेकऱ्यांचा सरदार म्हणाला. चार अरबाचे भाले त्याच्या गळ्याशीं येऊन भिडले.

तोंच पातशहानीं हात वर उचलला. भाले मागें सरले.

" येऊं द्या त्याला पुढें ! " शहेनशाहाची आज्ञा झाली.

जगन्नाथ सिंहासारखीं पावलें टाकीत समोर येऊन उभा राहिला.

" आपका इस्मे शरीफ ? " शहेनशाह गालात हंसत म्हणाले.

" पण्डित जगन्नाथ ! "

" वतन ? "

" वतन ? वतन हिन्दुस्थान ! "

" खूब ! " खुश होऊन शहेनशाह म्हणाले, " काय म्हणणें आहे ?"

" इन्साफ मागायला आलों आहें ! "

" कोणाविरुद्ध ? "

" काजीविरुद्ध ! ईमानची शराब पाजून जो शहेनशाहना धुंद करूं इच्छीत आहे, त्याच्याविरुद्ध ! "

" बेहया ! " काजी ओरडला.

" ठहरो ! " शहेनशाह म्हणाले, " पण्डित जगन्नाथ, जर तुमची बाजू गलत असेल, तर सजा काय मिळेल, मालूम आहे ? "

" काय ? "

" मौत ! "

" मंजूर ! "

" बोला तर मग ! "

" या म्हाताऱ्या काजीनें सागितलें त्याच्या अगदीं विरुद्ध कुराणची आज्ञा आहे ! "

" काफर ! तुला कुराण काय माहीत ?" काजी संतापाने किंचाळला.

" तुझ्यापेक्षा बेहत्तर ! ऐक ! पैगबरानीं सागितलें आहे, धर्मांच्या बाबतींत जबरदस्ती करूं नका ! "

" कशावरून ? झूट ! "

" ऐक ! म्हाताऱ्या, कुराणाची आयत ऐक ! "

**ला इकराहा फिद्दीन !**

अति शुद्ध, एखाद्या इमामाला, मौलवीलाहि लाजवील, असा तो कुराणाच्या आयतीचा घोष ऐकून सगळा दरबार चकित झाला. शहेनशाह शहाजहॉनीं आपल्या पलीकडे बसलेल्या म्हाताऱ्या उस्तादांकडे नजर टाकली. त्यानीं सहेतुक मान डोलावली.

" लेकिन हुजूर ! औरत जातीला रूह नसते—" काजीनें बोलायची धडपड केली.

" झूट ! हेहि झूट ! पैगंबर म्हणाले, जो स्त्रियांशीं आदरानें वागतो, तो धन्य होय ! "

**खैरकुम् खैरकुम्**
**ले अहलेही व अन्**
**खैरकुम्**
**ले अहलेही**

" बेहत्तर ! बेहत्तर ! " सभा गर्जली. राणा जौहरसिंगाची मुद्रा उजळून निघाली.

" परवरदीगार ! गुस्ताखी माफ हो ! लेकिन काफराची जान–जमीन ही ईमानदारांची दौलत आहे, असा आजपर्यंत रिवाज चालत आला आहे !" काजीनें शेवटची धडपड केली.

" हेंहि खोटें ! "

" कशावरून ? "

" पैगंबर गवाह आहेत ! "

" पैगबर ? "

" होय ! स्वत: पैगंबर ! त्यानीं सागितलें आहे—"

" पंडित जगन्नाथ, आम्ही तुमच्यावर एकदम खुश आहोंत ! बोला ! काय सागितलें आहे पैगबरानीं ? "

" हुजूर, पैगंबरानीं सागितलें आहे, कीं सगळे अल्लाचे भक्त एकमेकांचे बधु आहेत, याला गवाह स्वतः मी ! "

" आयत ! आयत ! " उत्सुक सभा गर्जली.

" ऐका ! "

**वकान दुआउहू बिल्लैली अशहदुअन्न**
**इबादल्लाहा कुल्लुहुम् इख्वतुन्**

" बेहतरीन ! बेहतरीन ! " सभेनें माना डोलावल्या.

" क्या पत्थर बेहतरीन ! " काजी भडकला, " काफ़र अल्लाचे भक्त नाहींत ! "

" का डोळ्यावर कातडें ओढतोस म्हाताऱ्या ? "

" कातडें ? "

" साधें नव्हे, मगरीचें ! आठव नमाजाची बाग ! एका परमात्म्यानें हें सर्व घडलें ! ही कुदरती दौलत त्यानें एकट्याने निर्माण केली ! हिंदु काय आणि मुसलमान काय ! काय मुसलमान अल्लानें घडले आणि हिंदु सैतानानें ?

" जर हें सर्व त्याचेंच कर्तृत्व असेल, तर त्याला नाव वेगळें दिल्यानें त्यात बदल होतो काय ?

" तुम्ही फूल म्हणता, आम्ही पुष्प. तुम्ही चाँद म्हणतां, आम्ही चंद्र. तुम्ही कुदरत म्हणतां, आम्ही दैव. तुम्ही अम्मा म्हणता, आम्ही आई !

" वस्तु बदलली ? जर नाहीं, तर परमेश्वराला अल्ला म्हटल्यानें तो बदलला ? अल्लाला परमेश्वर म्हटल्यानें त्यात परिवर्तन झालें ?

" आमचा वेदान्त म्हणतो,

**एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति ।**

" एक वस्तु नाना नावानीं ओळखली गेली.

" भाषा सपन्न झाली ! शब्दाला मोल आलें ! अक्षराच्या अर्थाला साज चढला !

" वाचाशक्ति नटली, वैखरी धन्य झाली, वक्तृत्व सफल झालें !

" अरे कर्मदरिद्र्या, याबद्दल खेद करतोस ? शब्दाच्या गौरवाबद्दल ? अर्थाच्या विलासाबद्दल ? "

शहेनशाह उठून उभे राहिले. त्यांच्याबरोबर दरबारहि. शाही

तख्तावरून खालीं उतरून शाहजहॉ जगन्नाथाजवळ आले, आणि मोठ्या गौरवाने हातींचे फूल त्याच्यापुढे करून ते म्हणाले,

" पण्डितराज जगन्नाथ ! तुमच्यावरून काय कुरबान केलें म्हणजे तुमचा उचित गौरव केल्यासारखें होईल ? हें फूल ? "

आदराने तें फूल हातीं घेत जगन्नाथ बोलला,

" शहेनशाह ! मी सतुष्ट होईन त्या बैरागिणीला सोडल्यानें ! "

मागें वळून शहाजहॉ म्हणाले,

" कमालखॉ ! आत्ताच्या आत्ता घुडसवाराचा काफला जाऊ द्या दिलेरखॉच्या वाड्यावर ! बैरागिणीला सोडवून आणा, आणि दिलेर-खॉच्या उघड्या पाठीवर पन्नास फटके उडवा ! चादनी चौकात ! जाव ! अभीके अभी ! "

जगन्नाथाकडे वळून शहेनशाह म्हणाले,

" पण्डितराज, आपण आज सायंकाळीं शाही चष्म्याजवळील महलात आपली पायधूळ झाडाल काय ? "

" जशी शहेनशाहाची इच्छा. "

पातशाहा निघाले. ते निघताच शाहजादा दारा एकदम पुढें घुसला. जगन्नाथाचे हात धरून मोठ्या स्नेहानें दाबीत तो म्हणाला,

" पण्डितजी ! मी दारा ! "

जगन्नाथास काहीं कळलें नाहीं.

दाराच्या बरोबर असलेल्या सरदारानें सागितलें,

" पण्डितजी, शहेनशहॉचे ज्येष्ठ पुत्र शाहजादा दाराशुकोह ! "

" ओह् ! "

" नाहीं पण्डितजी ! आपल्याला नुसतें ओह् म्हणून भागणार नाहीं ! "

" मग ? "

" अब्बाजाननीं आपल्यावर रहम केला ! "

" काय ! "

" आपल्याला मोकळें सोडलें ! "

" हूं ? "

" होय ! त्याची ही चूक मी दुरुस्त करीन ! "

" कशी ? "

" आपल्याला सजा फर्मावून ! "

" काय ? "

" आपल्याला आम्ही कैदेची सजा फर्मावीत आहोत ! "

" कैदेची ? "

" होय ! आता आपल्याला आमच्याबरोबर आमच्या महालांत यावें लागेल ! "

" आणि ? "

" आणि ? आणि पण्डितजी, हें सगळे तत्त्वज्ञान मला शिकवावे लागेल!"

दारा मोठमोठ्याने हंसूं लागला. पुनः एकदा स्नेहभरानें जगन्नाथाचा हात हलवीत तो म्हणाला,

" या छोट्याश्या उमरींत तुम्हाला जें कळले, तें त्या म्हाताऱ्याच्या स्वप्नातहि कधीं दिसलें नाहीं त्याला ! अब्बाजान तुमच्यावर बहुत खुश आहेत पण्डितजी ! ते तुम्हाला सोडणार नाहींत ! पण माझ्यासाठीं तुम्हाला दिवसातून दोनचार घटका वेळ काढायला हवा, हें अगोदरच सागून ठेवतो तुम्हाला. "

" अवश्य ! मला कळतें ते आपल्यासारख्या जिज्ञासूपुढे मांडण्यात मला मोठा संतोष होईल. पण केवळ आजचा दिवस आपण माझ्यावर रहम करा. "

" का ? "

" त्या बैरागिणीची मुक्तता झालेली पाहिल्याशिवाय मला काहींहि गोड लागायचें नाहीं."

" तुम्ही काळजी करू नका पण्डितजी ! अब्बाजानचा हुक्म तंतोतंत पाळला जाईल ! "

" तरी पण—"

" ठीक आहे. पण उद्यां सकाळीं मात्र—"

" होय ! उद्यां सकाळीं आपल्या महालाकडे अवश्य येईन."

दारा गेला, आणि राणा जौहरसिंग पुढें होऊन गद्गद स्वरानें म्हणाले,

" पण्डितजी ! काय वाटेल ते केलें तरी आम्ही आपल्या उपकारातून उतराई होऊं शकणार नाहीं ! "

" उपकार ? उपकार कुणावर ? "

" आम्हावर ! "

" नव्हे ! उपकार नव्हेत. आणि जर असलेच, तर ते तुमच्यावर नव्हेत."

" मग ? "

" माझे माझ्यावर ! "

" असें कसें पण्डितजी ? "

" तसेंच तें. माझी प्रतिज्ञा होती ! मी दिल्ली जिंकीन ! आज तिच्या पूर्णतेची पहिली चढण मी यशस्वीपणें चढून गेलों. इथून पुढें जेव्हा मी माझ्या यशाचे टप्पे आक्रमीन, तेव्हा—"

" होय पण्डितजी ! तेव्हा आम्ही आपल्या मागें राहून आपल्यावर छत्रचामरें उधळीत चालूं ! "

जगन्नाथ जौहरसिंगाबरोबर दिवाण-ई-आममधून बाहेर पडला.

आणि सज्जातील मृगनयना ?

अनिर्वचनीय तृप्तीचा आनद अनुभवीत ती एका गवाक्षाजवळ बसून दरबाराकडे पहात होती. युवा, ज्ञानसम्पत्तीने श्रीमन्त जगन्नाथाचें तें तेजस्वी रूप आपल्या नयनसंपुटात सांठवून ठेवायचा तिचा कमालीचा प्रयत्न चालला होता. नेत्रांच्या पापण्या झाकत, तेवढा वेळहि तिला प्रियदर्शनातील वर्षाएवढा प्रत्यवाय भासत होता !

शहाजहॉं गेल्यावर इतर शहेजाद्या तोंडें वाकडीं करीत गजगतीनें चालण्याचा प्रयत्न करीत, आपल्या सख्याशीं कुरबुर करीत, बाद्यांना शिव्या देत निघाल्या. शहेजादी सलीमाचें पानदान मागें राहिलें, म्हणून तें नेण्या-साठीं तिची दासी परत आली.

समाधि लागलेली मृगनयना तिनें पाहिली. आश्चर्यानें तिच्याजवळ जाऊन तिच्या खांद्यावर हात ठेवीत दासी म्हणाली,

" लवगी ! "

तन्द्री भगून लवंगीनें मागे पाहिले. दासी आश्चर्यानें थक्क झाली.

लवगीच्या भल्या मोठाल्या डोळ्यातून तृप्ति रसरूप धारण करून वहात होती !

" काय हें ? "

" पूजा ! "

" कुणाची ? "

" असहाय्य निरुपाय स्त्रीसाठीं स्वतःचा जीव हातीं घेऊन धांवणाऱ्या वीराची ! "

" काफराची ? "

अति व्याकुळ होऊन लवंगीनें दासीच्या तोंडावर हात ठेवला.



# ६

भोजनें उरकल्यावर राणा जौहरसिंगजी म्हणाले,

" पण्डितराज, आता आपण थोडी विश्राति घ्यावी. "

" विश्रातीची काय आवश्यकता ? "

" भरपूर आहे ! आजपर्यंत कुणींहि न जिंकलेल्या युद्धात आपल्या पाण्डित्याच्या चातुरीनें आपण यशस्वी झालात ! ही वार्ता वाऱ्यावर स्वार होऊन सबंध दिल्ली नगरात पसरली आहे. दुपारीं आपले दर्शन घेण्यासाठीं लोकाच्या झुडी वाड्यासमोर जमा होतील. त्याना सगळ्याना आशीर्वाद देता देता—"

" आशीर्वाद ? "

" होय ! आशीर्वाद पण्डितजी ! हा आमचा देश ! आमच्या पूर्वजानीं घामाचे पाट वाहवून वसवलेला, रक्ताच्या नद्या वाहवून आकारास आणलेला ! इथल्या धान्याच्या प्रत्येक रोपातून, बागातल्या प्रत्येक फळातून आमची अस्मिता उदयास येत असलेली दिसेल !

" आज दुर्दैवानें त्याच या देशांत आम्ही गोंवऱ्या वेचीत आहोत ! उद्याच्या उदयाच्या पर्वणीची वाट पहात कसे तरी जीव धरून राहिलों आहोंत ! मार खात, अपमान सोशीत, अवहेलना सहन करीत—"

कुठे तरी पहात असलेला जगन्नाथ एकदम बोलला,

" हेंच ! हेंच व्हायचें ! "

" काय व्हायचें पण्डितजी ? "

" हेंच ! "

जौहरसिंगजी वेड्यासारखे जगन्नाथाच्या तोंडाकडे पहात राहिले. तो मध्येंच खण्डित होऊन वाहणाऱ्या प्रवाहाप्रमाणें थाबत थाबत बोलू लागला.

" जो आपल्याभोंवतीं सीमा निर्माण करून घेतो--रूढींच्या-बंधनाच्या-परम्परेच्या---! परिस्थितीच्या असीम प्रवाहावर स्वार होऊन लीलया पोहत न जाता जो त्या बलवान्, प्रचण्ड प्रवाहाच्या वेगानें घोटाळतो-गोंधळतो-थाबतो-तो असाच---असाच धक्के आणि चपेटे याचा धनी होतो !

" आणि मग स्वत:चें सामर्थ्य, पराक्रम, तेज, विस्तार या सर्वांचा विसर पडून तो अशा कुणाच्या तरी आशीर्वादाची वाट पहात बसतो !

" तो कुणीतरी येईल ! मी त्याच्याकडे केविलवाण्या दृष्टीनें--आसुसलेल्या नेत्रांनीं पहात राहीन !

" कारण त्याच्या आशीर्वादावरच आमच्या उत्थानाचा मुहूर्त अवलंबून आहे---"

जौहरसिंगजींना काहीं बोध झाला नाहीं. जगन्नाथ थाबला हे पाहून काहींतरी बोलले पाहिजे, या जाणिवेने ते म्हणाले,

" पण पण्डितजी---"

एक पहारेकरी आत आला, आणि मोठ्या विनयाने म्हणाला,

" माईजी आल्या आहेत ! "

" असे ? "

" होय. पण्डितजींना भेटायचे---"

जौहरसिंगजी उठून बाहेर गेले. जगन्नाथ एकटाच कधींहि न पाहिलेल्या माईजींची वाट पहात बसला.

त्याने दरबारात तिच्यासाठीं झुज दिली होती, ती केवळ एका स्त्रीवर झालेल्या अत्याचारानें चिडून जाऊन. लोक म्हणत, ती दिसायला चागली आहे. त्यानें हें विधान गृहीत धरलें. ते म्हणत, ती फार चांगलें गाते. यालाहि अर्थातच त्याचा काहीं आक्षेप असायचें कारण नव्हतें.

पण ती चांगली न दिसता वाईटहि दिसती आणि तिचा आवाज ऐकून माणसे मोहून न जाता गाव सोडून पळून जातीं, तरी त्यानें तिच्या-साठीं असेंच युद्ध केलें असतें ! कारण तिच्यावर झालेला अन्याय हा एका स्त्रीवर झालेला अन्याय होता ! सीतेवर–द्रौपदीवर–सतीवर—

आणि माईला पहाताच जगन्नाथ आश्चर्यानें स्तिमित झाला !

होय ! सती ! पार्वती !

जौहरसिंगजींच्या पाठोपाठ ती सदरेंत शिरली––सतीचे तेज बरोबर घेऊन !

तिला पाहताक्षणींच जगन्नाथाच्या मनात आलें,

" या पावित्र्यासाठीं मीं जळत्या आगींतहि उडी घेतली असती ! बेधडक !

" दुर्गाम्बा !

" होय ! माझ्या दुर्गाम्बेसारखीच निर्मल, शात—"

जगन्नाथाजवळ येऊन जौहरसिंगजी म्हणाले,

" हे पण्डित जगन्नाथ ! वादकेसरी––"

जगन्नाथ पटकन् उठून उभा राहिला. माईकडे हात करीत जौहरसिंगजी बोलले,

" आणि या माई–"

" होय ! ओळखलें ! "

" ओळखलें ? " माई आश्चर्यानें म्हणाली.

" होय ! खूप दिवसाची ओळख आहे ! "

जौहरसिंगजी चकित होऊन बोलले,

" खूप दिवसाची ? "

" होय ! खूप दिवसांची. बाबा भागवत शिकवीत, तेव्हां ती पूर्वींची ओळख पुनः जागी झाली ! "

" कशी ? " माईने हतबुद्ध होऊन विचारलें.

" तें मग सागेन. भागवत आणि रघुवशाचें अध्ययन सुरू असता अनेकदा–"

माई गोंधळून म्हणाली,

" काहींतरी चूक होत्येय् आपली--"

" नाहीं ! मुळींच नाहीं ! दक्षानें यज्ञ माडला. त्यानें निमत्रण न केल्यामुळें किंचित् रुष्ट होऊन यज्ञास उपास्थित राहण्याची अनुज्ञा पशुपति देईनात. तेव्हा त्याच्याजवळ हट्ट धरून, पडत्या फळाची संमति घेऊन जेव्हां दक्षाच्या घरीं गेलात, आणि शेवटीं त्यानें अपमान केल्याने सतापानें थरथरत जेव्हा तुम्हीं यज्ञात उडी घेतलीत, तेव्हापासून मी तुम्हाला ओळखतो आहें ! या जन्मीं भागवत शिकत असता पुनः एकदा ती जुनी स्मृति जागी झाली ! कारण—

" कारण पशुपतीच्या भूतगणापैकीं एका शृंगीभृंगीच्या रूपानें मीहि यज्ञप्रसंगीं तुमच्याबरोबर होतों ना ? "

आता कुठें माईच्या अंतरात प्रकाश पडला. तिला अगदीं गद्‌गदून आलें. तिनें आपला आवेग दाबायचा प्रयत्न केला, पण तो असफल झाला. तिचें न ऐकता तिचे डोळे वाहू लागले. भरलेल्या आवाजात ती म्हणाली,

" आठवले ! आतां आठवलें मला ! "

" आठवलें ना ? "

" होय ! नेमकें आठवले ! पण तुम्ही मात्र आपले पूर्वजन्म विसरलात- ! "

" विसरलो ? "

" होय ! तुम्ही शृंगीभृंगी नव्हतात ! "

" मग ? "

" वीरभद्र ! ज्यानें अर्थाअर्थीं कांहीं संबध नसताहि सतीच्या त्या अपमानाबद्दल दक्षाला धरणीवर लोळवले, बुकलून ठार मारलें, आणि शेवटीं त्याचें मस्तक पिरगळून उपटून काढून यज्ञदेवतेला पूर्णाहुति दिली, त्या वीरभद्राचे रूप लेऊन तुम्हींच त्या वेळीं यज्ञभूमीचें समरागण केलें होतेंत ! "

जगन्नाथ अति प्रसन्न होऊन खो खो हंसत सुटला. माईहि हंसू लागली. जौहरसिंगजीहि. माई पुढें म्हणाली,

" एवढेच नव्हे ! त्यानंतर अनेक जन्म कधीं मी थोरली आणि तुम्ही धाकटे, कधीं मी धाकटी तुम्ही थोरले, अशीं बहीणभावडाचीं रूपें लेऊन आपण वाटचाल करीत आहोत.

" या जन्मीं मी झाल्ये थोरली, तुम्ही झालांत लहान ! "

तत्क्षणीं जगन्नाथ हंसायचे थाबला. भावानिर्भर होऊन तो म्हणाला,

" होय माई ! तूं थोरली बहीण, मी धाकटा ! दुर्गाम्बा लहान, तूं मोठी ! तुम्हा दोघींच्या मधला मी ! "

" आणि म्हणूनच कदाचित् पुनः विस्मरण होईल, या धास्तीनें मीं ही राखी आणली आहे ! ही अशी हातात बाधून ठेवत्यें या माझ्या विसरभोळ्या भावाच्या ! म्हणजे तो पुनः कधीं चुकारपणा करून विस्मरणाचें निमित्त सागणार नाहीं ! "

माईने आपलें किंचित् मलिन झालेलें भगवें वस्त्र सावरीत जगन्नाथाच्या हातात राखी बाधली.

अपूर्व स्नेहानें तिच्या त्या शान्त मुद्रेकडे पहात जगन्नाथ म्हणाला,

" माई ? "

" काय ? "

" आता कुठें राहाणार तूं ? "

" कुठेंहि ! सब भूमि गोपाल की ! तुझ्यासारखे प्रबलप्रतापी बन्धु मागें उभे असता कुठें राहू, ही चिंता मला कशाला ? "

" बरोबर बावाजी आहेत ते—"

" ते माझे श्वशुर ! "

" तुझे लग्न झालें आहे तर—"

" झालें होतें ! एका रात्रीं मीं तें स्वप्न पाहिलें होतें ! त्यानंतर— पण तूं जेवायला ये ना ! मी रोज भिक्षा मागून आणते. तुला चालेल भिक्षेचे अन्न ? "

" तुला चालतें ? "

" होय ! "

" तर मग मलाहि चालले पाहिजे ! राहात्येस कुठें ? मशिदीसमोर—"

जौहरसिंगजी म्हणाले,

" नाहीं पण्डितजी ! दिल्लीबाहेर माझी एक बाग आहे, रामबाग. त्या बागेंत एक छोटेसें शिवमंदिर आहे. तिथें हलविला आहे या मडळीचा पडाव. मीं पुष्कळ आग्रह केला. म्हटलें, माझ्या घरचें अन्न हें भिक्षान्नच आहे ! पण माई—"

" राणाजी ! खात्यें तें कुणाचें ? तुमचेंच नव्हे काय ? बाबाजींची आज्ञा आहे, कीं भिक्षा मागितली पाहिजे ! पाच घरीं. ती मला मोडता येणार नाहीं. "

" मोडूच नकोस माई तूं ! मग आज रात्रीं येऊं जेवायला ? "

" ये ! स्वयंपाक करून तुझी वाट पहात असेन—"

पुन: पहारेकरी आत डोकावला.

" काय आहे रे ? "

" जहापन्हाकडून पण्डितजीसाठीं पैगाम आला आहे ! "

" होय ! येतात म्हणून साग. "

" आज रात्रीं माई ! आज रात्रीं ! "

" होय ! "

माई गेली. एका शृंगारलेल्या पालखींत बसून जगन्नाथ शहाजहाँच्या जलमन्दिराकडे निघाला. सबंध वाटेने त्याला जागोजाग आज घडलेल्या वादगार्ची चर्चा करीत असलेले लोक दिसले.

शाही राजवाड्याच्या भागात प्रवेश करताच जगन्नाथाला एका नवीन जगात पाऊल घातल्याचा भास झाला. जागोजाग उग्र दिसणारे पठाण पहारेकरी गळ्यात गलथानपणे अडकविलेलीं जड तोस्तदानें आणि बन्दुका पेलीत उभे होते. हातीं झाकलेलीं तार्टे घेऊन काळेकुट्ट खोजे इकडून तिकडे धावत होते.

जलमन्दिराच्या बाहेर पालखी थांबली. जगन्नाथ पालखींतून उतरला. शाही पैगाम घेऊन आलेल्या जासूदामागोमाग तो आत निघाला.

जलमन्दिराच्या मध्यभागीं असलेल्या विस्तीर्ण चौकात प्रवेश करताच जगन्नाथ आश्चर्यानें थक्क झाला ! क्षणभर तो उभाच राहिला.

त्या चौकात सगमरवरी दगडांनीं बाधलेला एक विस्तीर्ण तलाव होता. त्यांत अनेक छोट्या छोट्या कारजाची एक पंक्ति होती. तिच्या मध्यभागीं उंच उडणारें एक भव्य कारंजे आकाशात पाणी फेंकीत उभे होतें.

त्या जलाशयात कमलें उमललीं होतींच, पण त्या कमलाना लाजवील, असें सौंदर्य अंगीं मुसमुसत असलेल्या अनेक युवती पाण्यात पाय सोडून एकमेकींची थट्टा करीत बसल्या होत्या !

जगन्नाथाला पाहताच त्या त्याच्याकडे खोड्याळपणें बघत एकमेकींच्या अंगावर पाणी उडवूं लागल्या. जगन्नाथ तृप्त नेत्रानीं तें ईश्वरीय सौदर्याचें मानवराचित प्रस्फुटित रूप पहात राहिला.

जासूद खाकरला. तें खाकरणें ऐकून जगन्नाथ भानावर आला, आणि त्याच्या मागोमाग चालूं लागला. तलावाच्या दुसऱ्या अगाला एक चौथरा होता. त्या चौथऱ्यावर शुभ्र, तलम वस्त्रे ल्यालेले शहेनशाह शहाजहाँ बसले होते. हातीं शराबची प्याली घेऊन एक देखणी दासी त्यांच्या पलिकडे तिष्ठत होती.

जगन्नाथ आंत शिरल्यापासून शहाजहाँ त्याच्याकडे पहात होते. त्याचें विस्मयचकित होणें, उभे राहणें, त्या युवतींची जलक्रीडा रसिक नेत्रानीं पाहणें, हें सर्व त्यानीं हेरलें होतें.

तो जवळ पोंचताच शहाजहाँ खदखदून हंसुं लागले.

" आइये पण्डितजी ! ऊंहूं ऊंहूं ! तिथें नव्हे ! इथे ! आमच्याजवळ !"

मोठ्या संकोचानें जगन्नाथ चौथऱ्याच्या पायऱ्या चढला. शहाजहाँनीं त्याचा हात धरून त्याला आपल्या जवळ बसविलें.

" आवडला हा शाही चष्मा ? "

" आपल्या रसिकतेहून कमी आवडला ! "

" म्हणजे ? "

" म्हणजे हें दृश्य तर सुंदर आहेच, पण ज्यानें हें घडविले, त्याला नेटका आकार दिला, त्याची रसिकता याहून शतपटीनें देखणी आहे. "

" शाब्बास पण्डितजी ! बेहतरीन ! मग मघा थाबला होतात, ते कशासाठीं ? आमच्या रसिकतेवर मोहून जाऊन ? "

" मुळींच नाहीं ! "

" मग ? "

" त्या बिचाऱ्या भुंग्याविषयीं दया निर्माण झाली म्हणून ! "

" कुठले भुंगे ? "

" भ्रमामुळें मध्येच घोटाळत राहिले होते ते. "

" कसला भ्रम ? "

" त्याना कमलें कोणतीं तें कळेना ! "

" उमजलें नाहीं पण्डितजी !"

" ऐकावें. जलाशयातलीं अति सुंदर कमलें त्यांनीं पाहिलीं. "

" होय. तीं आम्हीं मुद्दाम बगालमधून आणविलीं आहेत ! "

" त्याचे सौंदर्य पाहून लुब्ध झालेला भ्रमरसमूह त्याच्याकडे धाव घेतोय् तोंच—"

" तोंच काय ? "

" तोंच त्या समूहाच्या ध्यानीं आलें, कीं इकडे तटाकावरहि कमले उमललीं आहेत ! "

" कमलें ? "

" होय ! तारुण्यमदानें ज्यांचे नेत्र धुंद झाले आहेत, ज्याच्या उष्ण, सुगंधी श्वासानीं वातावरण दरवळले आहे, अशा युवतींचीं वदनकमलें—! "

" ओहो ! क्या खूब ! पण्डितजी ! आम्ही आपल्यावर बेहद्द खूष आहोंत ! "

शहाजहॉनीं आपल्या गळ्यातील मोत्याची माळ जगन्नाथाच्या गळयात घालीत म्हटलें, " मग पुढें ? "

" पुढें काहीं नाहीं ! भुगे एकदा इकडे धावताहेत, एकदा तिकडे ! याची दया येऊन मी क्षणभर उभा राहिलो होतों ! "

" वाहवा ! पण्डितजी, यावर एखादा श्लोक करा ना ! "

क्षणभर थांबून जगन्नाथ म्हणाला,

" ऐकावें जहॉपन्हा ! "

तीरे तरुण्या वदनं सहासं
नीरे सरोज च मिलाद्विकासम्
आलोक्य धावत्युभयत्र मुग्धा
मरन्दलुब्धालिकिशोरमाला ॥

" ओहो ! बेहतरीन ! पण्डितजी ! बेहतरीन ! "

क्षणभर डोळे मिटून शहाजहॉं म्हणाले,

" पण्डितजी ! आपण आपल्या पायानीं चालत आमच्या घरीं आलात ! आम्हीं आजपर्यंत आपली कदर केली नाहीं, याबद्दल आमच्या दिलात रज होतो आहे ! पण आता आम्ही ती गलती पुढे होऊं देणार नाहीं ! "

" अर्थ कळला नाहीं ! "

" सागतो. आम्ही आपल्यासाठीं आमच्या दरबारात शाही पण्डिताची जागा निर्माण करून ती आपल्याला नजर करीत आहोंत ! "

" नजर ? "

" होय पण्डितराज ! शहाजहॉं या देशाचा पातशाह आहे खरा. पण पण्डिताच्या सभेत तो एक सामान्य दरकदार आहे ! त्या सभेचे शहेनशाह आहेत-- "

" कोण ? "

" पण्डितराज, राजतिलक जगन्नाथ ! "

अत्यानदाने क्षणभर जगन्नाथ गागरला, पण लगेच सावरून तो म्हणाला,

" मी जहॉपन्हाचा हा सन्मान एका अटीवर स्वीकारतों ! "

" कोणती अट ? "

" मला वाटेल तेव्हाच मी दरबारात येईन ! "

" मजूर ! "

" तर मग आता रजा घेऊ ? "

" आताच ? "

" होय ! "

" आज रात्रीं आम्हाबरोबर जेवला असतात-- "

" माफ करा जहॉपन्हा ! मीं एका ठिकाणीं जेवायला जायचें कबूल केलें आहे ! "

" कुठे ? "

" एका भिक्षेकरणीकडे ! "

" भिक्षेकरीण ? "

" होय जहॉपन्हा ! "

" शाही खाना टाकून एक भिखारनकडले जेवण—" शहाजहॉ आश्चर्यानें म्हणाले.

" ऐकावे जहॉपन्हा ! कमल अत्यंत निर्मळ पाण्यात जन्मलें !

" कमनीय अशा रमणीमुखाशीं स्पर्धा करणारी कोमलता लाभली त्याला !

" भगवान् विष्णूने तें आपल्या करीं वागविलें.

" त्याच्या सुगंधामुळें आपणासारख्या पृथ्वीपतीलाहि वेड लागलें !

" कविश्रेष्ठानीं आपली अलौकिक प्रतिभा कमलाचीं वर्णने करण्यात खर्च केली !

" मदनानें आपलें अस्त्र होण्याचा मान कमलास दिला !

" तरी—

" तरी यापैकीं एकाहि मोहास लुब्ध न होता कमल सर्वदा, सर्वकाल काळ्याकुट्ट भ्रमरासच आपला स्नेह समर्पीत आले आहे !

नीरान्निर्मलतो जनिर्मधुरता रामामुखस्पर्धिनी
वासो यस्य हरेः करे परिमलो गीर्वाणचेतोहरः ॥
सर्वस्वं तदहो महाकविगिरा कामस्य चाम्भोरुह
त्व चेत्प्रीतिमुरीकरोषि मधुपे तत्त्वा किमाचक्ष्महे ॥

" तेव्हा—"

" पुरे पण्डितराज ! आपण स्वतंत्र आहांत ! शाही रहेमाच्या सोनेरी शृंखलापासून कितीतरी दूर आहे आपलें स्थान ! आपण इच्छेस येईल तिकडे जाऊ शकता ! "

शहाजहॉं स्वतः उठले, आणि पण्डित जगन्नाथाचा हात धरून त्याला जलमन्दिराच्या दारापर्यंत घेऊन गेले.

" आता केव्हां याल ? "

" आपण बोलवाल तेव्हा ! मीं मघा अट सांगितली, ती केवळ दरबारात येण्याविषयीं. "

" ठीक आहे "

शहाजहॉं परतले, आणि आपल्या आसनाजवळ पोंचतात, तों शहेजादी सलीमा लवंगीला ओढीत इकडे येत असलेली त्यानीं पाहिली !

" अरी क्या है ? " आश्चर्यानें शहाजहॉं म्हणाले.

सलीमेने लवंगीला सोडले. ती आपले तोंड दोन्ही हातानीं झाकून धावत शहाजहॉंजवळ आली, आणि त्याच्या पायांजवळ खालीं कोसळली. तिला उठवून स्नेहानें तिच्या पाठीवरून हात फिरवीत शहाजहॉं बोलले,

" क्या है बिटिया ! "

उत्तर न देता ती त्याच्या कुशींत तोंड लपवून राहिली. अधिकच चकित होत शहाजहॉंनीं विचारलें,

" हम कैसे समझें बिटिया कि तू क्या चाहती है ? "

उत्तर दिले सलीमेने.

" अब्बाजान ! आपण या पोरीकरिता केलेले सगळे श्रम व्यर्थ गेले !"

" क्यों ? "

" ही एका काफरावर भाळली ! "

" काफरावर ? " चकित होऊन शहाजहॉंनीं पुसलें.

" होय अब्बाजान ! एका दरिद्री काफरावर ! "

दाढींत बोटें चाळवीत शहाजहॉं म्हणाले,

" खुदा ! तेरा शुक्र ! क्या यह सच है बिटिया ? "

यावेळीं लवंगीने आपलें मस्तक वर उचलले. अत्यत देखण्या अश्रुपूरित नयनांनीं शहेनशाहाकडे बघत ती गद्‌गद स्वरांत म्हणाली,

" अब्बाजान ! मुझे—"

" क्या बिटिया ? "

" मुझे जहर दो ! "

अत्यंत स्नेहाने तिला आपल्याबरोबर चौथऱ्याकडे नेऊन शेजारीं बसवीत शहाजहाँ म्हणाले,

" क्या कर रही बिटिया ! मला साग सगळें ! कुण्या जालिमावर तुझें दिल आषक झाले ? "

लवंगीने पुनः तोंड खालीं घातलें. सलीमा फणफणत म्हणाली,

" अब्बाजान ! आपण शिकारीहून परतल्यावर हें एवढेसें लेकरूं अम्माजानजवळ दिलेत, आणि मोठ्या कौतुकानें तिला सागितलेंत, हिला साभाळा ! "

" हॉं बेटी ! त्या दिवशीं एका शेराशीं झुंज होऊन तो माझ्या हातून मारला गेला होता ! आम्ही मोठ्या आनदाने परतत आहोंत, तों वाटेंत एका झाडाखालीं कपड्यात गुंडाळून ठेवलेली ही सापडली ! आमची याद बिल्कुल ताजी आहे ! "

" आणि मग अम्माजाननें हिला अगदीं आमच्या बरोबरीनें वागविलें ! कोण्या गोष्टीचा उणेपणा भासूं दिला नाहीं ! पण अगदीं लहानपणापासून मला ही वेगळी आहेसें वाटायचे. कोण्या गोष्टींत आनद नाहीं ! न खाण्यात, न पिण्यात ! न पुलावात, न शरबतात ! आम्ही सगळ्या खातपीत असूं ! अन् ही वेड्यासारखी कुठें तरी पहात असायची ! मला अनेक दिवस हें कोडें होतें ! शेवटीं त्याचा उकल हा असा झाला ! दळभद्री मेली !"

" नहीं शहेजादी ! माझी ही पोर मोठी शहाणी आहे ! उगीच कुणावर भाळणार नाहीं ती ! लेकिन--लेकिन त्याचें नाव— "

" तिच्या तोंडातून शब्द नाहीं निघायचा अब्बाजान ! मी सागत्यें ! काल दरबारांतच मीं हें हेरले ! आणि आज त्या सगमरवरी जाळीजवळ डोळ्यांत प्राण आणून त्या मेल्याच्या तोंडाकडे पहात होती ही ! "

" कुणाच्या ? " विस्मित शहाजहॉनीं विचारलें.

" त्या पण्डिताच्या ! दरिद्री– "

" चुप ! चुप ! " अत्यंत स्नेहानें लवंगीचें मस्तक उचलीत शहेनशाह म्हणाले, " क्या यह सच है बिटिया ? "

सकरुण दृष्टीनें तिनें त्याच्याकडे पाहिलें, आणि त्यांच्या छातींत तोंड खुपसलें.

" खुदा रहमदिल आहे! काय केलेंस हें पोरी! कट्टर ब्राह्मण तो! तो हें कबूल करील?"

" दुवा अब्बाजान! दुवा!" लवंगी पुटपुटली.

" दुवा है बिटिया! दुवा है! शहाजहाँ आपल्या बेटीसाठीं काय वाटेल तें करील!"



## ७.

सायंकाळीं दाराच्या महालातून जगन्नाथ बाहेर पडला, तो मोठा संतुष्ट होऊन. एक रसिक, सहृदय शिष्य मिळाला असल्याच्या उन्मादानें तो उन्मत्त झाला होता.

दारा रसिकाचें अंत:करण घेऊन जन्मला. आजपर्यंत त्याचें रसलुब्ध मन रसाच्या लोभानें नाना ठिकाणीं हिंडत होतें. कुराण तर दारानें कठगत केले होतेंच, पण त्याचबरोबर बायबल आणि काहीं उपनिषदेंहि त्याने धाडोळलीं होतीं. त्याच्या पणज्याने स्थापन केलेल्या 'दीने इलाही' या धर्म-पंथाचा फार मोठा परिणाम त्याच्या मनावर झाला होता.

आणि आज जगन्नाथाची गाठ पडताच त्याच्या लक्षात आलें, कीं जें आपण शोधीत होतों, तें शेवटीं मिळालें आहे ! हा गुरु वयानें युवा आहे, पण ज्ञानानें वृद्ध ! याचे ज्ञान केवळ घटोऽयं पटोऽयं पर्यंतच सीमित नाहीं, तर त्या मृण्मय घटांत आणि तंतुमय पटात असलेलें सौंदर्य याच्या अलौकिक काव्यप्रतिभेला दिसले आहे, तिनें तें पचविलें आहे !

जगन्नाथ उठला, तेव्हा त्याला पाच पावलें पोंचविण्यास येऊन दारा म्हणाला,

"पण्डितजी, तुम्हाला वाटत असेल, कीं आपली गांठ अचानक पडली ! पण हें अर्धसत्य आहे !"

"अर्धसत्य !"

" होय ! मीं कितीतरी तपश्चर्या केली आहे, अन् शेवटीं आपण लाभलात ! "

दाराचे हे शब्द आठवीत जगन्नाथ राणा जौहरसिंगजींच्या सेवकाबरोबर रामबागेकडे निघाला, तेव्हा दिवे लागले होते. नगराची शोभा पहात तो झपाझप चालू लागला.

रामबाग हे ठिकाण मोठें देखणे होतें. आंब्याच्या गर्द राईत मध्यभागीं बकुळींच्या झाडाचा थवा जमून बसला होता. त्याच्या मधोमध फुलझाडाच्या भल्या थोरल्या ताटव्यात एक छोटेसे शिवमंदिर होतें. समोर एक विहीर. विहिरीशेजारीं धर्मशाळा.

धर्मशाळेत माई स्वयंपाक करून केव्हाची जगन्नाथाची वाट पहात दाराशीं उभी होती. बाबाजी म्हणाले,

" पोरी, किती वेळ उभी राहशील ? बैस थोडीशी. "

" बाबाजी, ते येतील त्या वेळीं—"

" कोण जाणे येतात कीं नाहीं ! "

" कशावरून ? "

" नाहीं बेटा ! फार मोठा माणूस तो ! सगळी दिल्ली आज त्याला डोक्यावर घेऊन नाचत्येय्. वेळ झाला, न झाला ! "

" ऊंहू बाबाजी, त्यांनीं मला सांगितलें आहे ! ते येतील ! "

" येऊ दे. उमर काय आहे ग ? "

" उमर ? असेल चोवीसपंचवीस ! "

" लहानच तर आहे ग ! "

" हो ! बच्चनएवढा, माझ्या धाकट्या भावाएवढा ! बच्चनची आठवण झाली मला––"

" देव भले करो बिचाऱ्याचें—"

तों जगन्नाथ सेवकाबरोबर बकुळीच्या झाडातून पुष्पवाटिकेंत शिरला. आनंदानें माई म्हणाली,

" यावें ! यावें ! आज काय झालें आहे माहीत आहे का ? "

" काय ? " जगन्नाथ धर्मशाळेंत पाऊल घालीत म्हणाला.

" आजचा दिवस मोठा भाग्यशाली ! " माई बोलली, आणि गाऊं लागली,

आज हरी आयो विदुरघर पावणो ॥

तिचा अत्यंत मधुर स्वर आणि एकतानता अनुभवून जगन्नाथ पाषाणाच्या पुतळ्यासारखा स्तब्ध उभा राहिला. त्याची ती समाधि पाहून माई मोठमोठयाने हसत म्हणाली,

" काय झालें भैय्या ? "

शुद्धीवर येऊन तो म्हणाला,

" बरोबर ! बरोबर ! "

" काय बरोबर ? "

" बेटा पठाण सरदार मोठा रसिक होता, यात काहीं शंका नाहीं ! "

" का ? "

" तो या अपूर्व स्वरमाधुरीला भुलला, आणि त्यामुळे शेवटीं त्यानें फटकेहि खाल्ले ! "

" तुमच्यामुळें ! "

" माझ्यामुळे? बरें, माझ्यामुळें! पण माई, तुला एक करायला हवें ! "

" काय ? "

" ज्या वाड्यात तो वेदनांनीं तळमळत पडला असेल, त्याच्या बाहेर उभें राहून मालकंसाचे स्वर छेडले पाहिजेस तूं ! "

" म्हणजे काय होईल ? "

" आज त्याने एऱ्हवींच फटके खाल्ले ! हातीं काहीं लागलें नाहीं त्याच्या. त्याचे मूल्य त्याच्या पदरीं पडेल ! "

" गाईन ! पण बरोबर तुम्हीं—"

" तुम्ही नव्हे, तूं ! "

" होय भैय्या ! तूं आलें पाहिजेस ! "

" येईन कीं ! तुझें भिक्षापात्र हातीं धरीन मी ! म्हणेन, वाढा हो माई ! भिक्षा वाढा ! "

" मग काय होईल ? "

" मग ? मग एका शिवमंदिरासमोरील धर्मशाळेंतून एक माई बाहेर येऊन म्हणेल, जा बाबा ! आम्हीहि भिक्षेकरीच आहोंत ! "

" मग ? "

" मग मी म्हणेन, भिक्षा नको मला ! भरपूर मिळाली आहे ! थोडेसें गाऊन दाखवा ! "

" मग ? "

" मग काय ? मग कांहीं नाहीं. ती माई गाईल ! "

" मुळींच नाहीं गायची."

" का ? वा: ! ती फार चांगली--"

" ऊहूं ! अशा हरभऱ्याच्या झाडावर चढवण्याने ती फसायची नाहीं ! "

" मग ? "

" ती म्हणेल, भैय्या, तुला भूक लागली आहे ! अगोदर जेवून घे तूं ! जेवत असताना मी तुला वारा घालीन ! तुझे जेवण झाले, म्हणजे तू माझ्याजवळ बैस ! मी तुला एका मुलीची छानदार गोष्ट सांगेन—जेवतां जेवतां. आणि माझें जेवण झाले, म्हणजे बकुळीच्या झाडाखालीं चांदण्यात बसून मी तुला गाणे ऐकवीन ! "

" वा वा ! छान ! "

" तर मग पाय धू ! "

पाय धुऊन जगन्नाथ आत आला, तों बाबाजी समोर आले. माई म्हणाली,

" हे माझे श्वशुर—"

जगन्नाथ नमस्कार करण्यासाठीं खालीं वाकूं लागला तों त्याला बाबाजींनीं धरलें, आणि म्हणाले,

" चिरजीव हो बेटा ! माझा म्हाताऱ्याचा आशीर्वाद खोटा व्हायचा नाहीं ! आता मी ध्यानाला बसतो. तुम्ही दोघे बहीणभाऊ जेवून घ्या. मी एकदाच जेवतों, दुपारीं. आता ध्यानाला बसेन, तो मध्यरात्रीपर्यंत—समजलें ना बिटिया, नीट काळजी घे तुझ्या भावाची. "

जगन्नाथ एक लहानशा फळीवर जेवायला बसला. त्याच्यासमोर थाळी वाढीत माई म्हणाली,

" भैय्या, अन्न भिक्षेचे आहे, घी शक्कर रोटी नाहीं. तरी निंदा करायची नाहीं बरें का ! "

" का ? वाईट असले तरी—"

" राम राम ! भैय्या, भिक्षान्न आहे तें ! ब्रह्म आहे ! "

" ठीक आहे ! " जगन्नाथ घास घेत म्हणाला, " आजचें ब्रह्म फार रुचिकर झालें आहे ! मात्र हे रोटीब्रह्म थोडेंसें जळले आहे–"

माई हसू लागली. जगन्नाथ घास घेता घेता एकदम गंभीर होऊन म्हणाला,

" माई, साग. तूं हे संगीत कुठें शिकलीस ? "

" मग सागेन ना ! आत्ता तुला वारा घालत्यें. "

" नाहीं. आत्ता साग. "

" न सागितलें तर ? "

" मी जेवणार नाहीं ! "

जगन्नाथ हात आखडून बसला, हें पाहून माई घाबरून म्हणाली,

" अग बाई ! खरें कीं काय ? "

" मी सहसा खोटें बोलत नसतों ! "

" नाहीं भैय्या ! जेवून घे तूं ! कारण ती कथा ऐकल्यावर मग तुला जेवण जायचे नाहीं ! "

" एका पण्डितराजाला भीति घालत्येस ? जो व्याकरणाच्या स्वौजसमौट्शीं लीलया झुजला त्याला ? "

" भैय्या, तीं सूत्रें केवळ पाठ करायलाच अवघड आहेत. पण माझी कथा——नको भैय्या ! "

" का ? "

" तुझें जेवण विषमय होऊन जाईल ! "

" होऊं दे ! तूं साग ! "

एक श्वास सोडून माई म्हणाली,

" तुझी इच्छा ! ऐक तर ! माझे श्वशुर राठी ब्राह्मण—!"

" आणि तूं ?"

" मी ? आता मीहि राठी ब्राह्मण––भैय्या, जातींच्या या दुर्लंघ्य भिंतीवर तुझी श्रद्धा आहे ?"

" तें मग सांगेन. तूं अगोदर कोण होतीस तें सांग !"

" कायस्थ !"

" अरेरे ! मला बाटविलेंस तूं ! आता मला गंगेत स्नान करून––" आणि जगन्नाथ खो खो हसूं लागला.

" हंसतो आहेस काय भैय्या ?"

" हंसूं नको तर काय ? पोरींच्या घरकुलातल्या भिंतींसारख्या या जातींच्या भिंती !"

एक श्वास सोडून माई म्हणाली,

" चला ! सुटल्यें !"

" कशांतून ?"

" एका चिंतेतून ! तुला जेवायला निमंत्रण तर केलें, पण मग धास्ती वाटूं लागली, कीं तूं माझ्या हातचें जेवशील कीं नाहीं !"

" माई ! तूं चाभार असतीस तरी मी तुझ्या हातचे जेवलों असतों !"

" तरी देखील ?"

" होय !"

" पण–– "

" पण नव्हे माई ! ज्या दिवशीं आपण बहीणभावाच्या शुद्ध स्नेह-बंधनानीं बांधलों गेलो, त्या दिवशीं इतर सर्व बंधनें गळून पडलीं ! प्रेमाचे सामर्थ्य एवढें प्रचण्ड आहे ! थट्टेची वस्तु नव्हे ती. तें व्रत आहे. सतीच्या दिव्य दाहक व्रतासारखें.

" ज्यानें त्या व्रताचा स्वीकार केला, त्याचेसाठीं हीं जातींचीं बंधनें क्षुद्र पाल्यापाचोळ्यासारखीं होतात !

"तें व्रत भलत्याला स्वीकारता येत नाहीं. त्यानें तो प्रयत्नहि करूं नये !"

" कारण ?"

“ कारण? कारण तें प्रेम विषमुख अमृतकुंभ आहे. सामान्य जन्तु त्या विषाच्या दाहकतेनें मरून जातील. जो असामान्य असेल, तो तें विष पचवून अमर होईल ! मग त्याला—पण तूं तुझी कथा सागत होतीस माई ! ”

“ होय ! ” आपल्या डोळ्यातलीं आंसवें टिपून माई म्हणाली,

“ ऐक भैय्या, प्रेमाचें अमृत प्यालेली असल्यामुळेच जी जीवन्त राहूं शकली, अशा एकीची कहाणी !

“ बनारसला एका प्रचण्ड वाड्यात एक मुलगी रहात असे. तो वाडा तिच्या वडिलाचा होता. ते काशींतले एक प्रसिद्ध सावकार होते.

“ वाड्यासमोर एका दरिद्री ब्राह्मणाचें घर होतें. त्या लहानशा घरात दोघे पितापुत्र जें काय मिळेल त्यावर आपली उपजीविका करीत.

“ दरिद्री ब्राह्मणपुत्र अति उत्तम गात असत. जेव्हा ते गगेवरील घाटावर बसून आसावरीचे स्वर आलापीत असत, तेव्हा गगेतले मासेहि त्या घाटाजवळ गोळा होत !

“ सावकारकन्या आपल्या वाड्याच्या गच्चीवर बसून समोरील घरात चाललेली सगीतसाधना ऐके. ती बेभान होऊन जाई. तिला त्या सगीताचें वेड लागले.

“ एकदा तिचे वडील जेवण उरकून निघाले असता ती त्याच्या गळ्यात पडून म्हणाली,

‘ बाबा, मला गाणें शिकायचें ! ’

‘ बरें आहे. उस्ताद पीरजादेना सागतों.’

‘ नाहीं बाबा ! ’

‘ मग ? ’

‘ आपल्या घरासमोरील—’

‘ तो दरिद्री भट ! ’

‘ मला शिकवायचें असेल तर त्याच्याजवळ शिकवा ! ’

“ मोठ्या असंतुष्ट मनानें वडिलानीं तें कबूल केलें. त्याच्या एकुलत्या एका मुलीचें त्याना ऐकावे लागलें. ”

जगन्नाथानें विचारलें,

" असतुष्टतेचे कारण ? "

" कारण ? कारण अगदीं लहानसे होते. तें समोरचें घर विकत घेऊन आपल्या वाड्याचा दर्शनी भाग रमणीय करण्याचा प्रयत्न करून वडील थकले होते. म्हाताऱ्या ब्राह्मणाने ते नाकारले होतें. "

" मग ! "

" मग काहीं नाहीं. शिकवणें सुरू झाले. रोज सकाळीं ते ब्राह्मणपुत्र वाड्यात येऊन त्या मुलीला गायनाचे पाठ देत. देवाने मुलीला कण्ठ दिला, ब्राह्मणपुत्रानीं विद्या.

" तीन वर्षे ही सगीतसाधना चालली. मुलगी गाण्यात तयार झाली. देवानें दिलेल्या गळ्यावर ब्राह्मणपुत्रानीं स्वरसाधनेचा साज चढविला, आणि एक सुदर शिल्प निर्माण केलें.

" पण त्या पोरीने एक फार मोठी चूक केली ! "

" काय ? "

" तिने त्या दरिद्री ब्राह्मणावर प्रेम केलें ! "

" आणि ब्राह्मण ! "

" नाहीं हो नाहीं ! त्या मुलीनें आपलें हृदय प्रकट करीपर्यंत त्याना याची कल्पनाहि नव्हती. ते गंगेसारखे विशाल, ऋजु अंत:करण घेऊन जन्मास आले होते ! "

" मग ? "

" त्यांनीं त्या मुलीची समजूत घालायचा कसोशीचा प्रयत्न केला ! पण मुलीनें सांगितलें कीं तुम्ही नाहीं म्हणाल तर मी गळफास लावून घेईन !"

" एकदम गळफास ? "

" थाब भैय्या ! अशी चेष्टा करूं नकोस ! "

" हा चुप बसलों ! "

" नाहीं, तूं जेव ! अरे—! "

" काय झाले ? "

" तुझ्या पानातलें अन्न सपलें आहे. "

माईने जगन्नाथाच्या पानांत पोळ्यांची चवड ठेवली. तो आश्चर्यानें म्हणाला,

" एवढे खपेल ? "

" होय. ही कथा ऐकून अंगाची जी आग होईल, तींत हें सर्व अन्न जळून जाऊन आणखी भूक लागेल. "

" ठीक आहे, साग. "

" जेव्हा ब्राह्मणपुत्रानीं मुलीचा हा आग्रह बघितला, तेव्हा ते म्हणाले,

' पण तुझे वडील काय म्हणतील ? '

" क्षणभर थाबून मुलगी म्हणाली,

' आपण दोघे पळून जाऊ. '

" गंभीर होऊन ब्राह्मणपुत्र म्हणाले,

' हे माझ्या हातून व्हायचें नाहीं. '

' मग ? '

' मी तुझ्या वडिलास विचारीन ! '

" ते निघून गेले. त्या मुलीच्या एका म्हाताऱ्या मोलकरणीला हें माहीत होतें. ती म्हणाली,

' पोरी, हें बरें केले नाहींस ! '

" दुसरे दिवशीं ती उदास होऊन त्या मुलीजवळ आली, आणि म्हणाली,

' आज ते आले होते ! '

' कुठे ? '

' पेढीवर ! '

" अत्यंत उत्सुक होऊन मुलीने विचारलें,

' मग ? '

' त्यानीं तुझ्या वडिलाजवळ तुझ्यासाठीं मागणी घातली ! '

' बाबा काय म्हणाले ? '

' म्हणाले, तुमची आमची जात एक नाहीं, याची तुम्हास कल्पना आहे ना ?

‘ तुझे गुरुजी म्हणाले, मला जातीबाहेर पडावें लागेल हें मला ठाऊक आहे.’

‘ वडील म्हणाले, माझी संपत्ति पाहून तुम्ही हें दु:साहस करीत आहां काय ?

‘ गुरुजी म्हणाले, मुळींच नाहीं. लग्न होताच आम्ही मथुरेला जाऊं ! तिथें गोविंदलालाची सेवा करीत मिळेल ते खाऊन राहूं !

‘ वडील काही वेळ गप्प राहिले. त्यानीं ओठ चावला. त्याचे डोळे तांबडेलाल झाले. नंतर ते म्हणाले, आता तुम्ही जा ! मी विचार करून उत्तर देईन ! ’

“ त्यानंतर तीनचार दिवस त्या मुलीनें अत्यंत अस्वस्थपणे घालविले. पांचव्या दिवशीं रात्रीं मोलकरीण घाईघाईनें गुपचुप मुलीच्या खोलींत आली आणि तिला म्हणाली,

‘ बाहेर चल ! ’

“ त्या दोघी मोठ्या सावधानतेनें मागल्या दारानें बाहेर पडल्या. काशीच्या बोळातून बराच वेळ हिंडल्यावर मुलगी म्हणाली,

‘ कुठे जातों आहोत आपण ! ’

‘ तूं चल माझ्यामागें. ’

“ थोड्या वेळानें त्या मुलीला आढळले, कीं त्या दोघी काशीच्या महाश्मशानाच्या शेजारीं उभ्या आहेत ! मुलगी थाबली. मोलकरीण मागे वळून म्हणाली,

‘ तुला यायला हवें आहे ! ’

‘ का ? ’

‘ तुझ्या हातानें अग्नि मिळावा, अशी इच्छा त्यानीं प्रकट केलेली होती!’

“ भयचकित होऊन थरथरत्या मनाने मुलगी मोलकरणीमागें चालू लागली. जळत असलेल्या प्रेताच्या मधून वाट काढीत त्या दोघी गंगेजवळ येऊन पोंचल्या.

“ तिथें वृद्ध ब्राह्मण एका गाठोड्यासमोर बसले होते !

“ त्या गाठोड्यात त्याच्या पुत्राचे खण्डखण्ड केलेले अवयव होते !

"मुलगी झीट येऊन खालीं कोसळली. मोलकरणीने पाणी शिंपडून तिला शुद्धीवर आणलें. शुद्धीवर येताच ती आपल्या प्रियकराचें रक्तलांछित मस्तक उराशीं धरून धाय मोकलून रडूं लागली ! रक्तानें लडबडलेल्या मुखाचें दीर्घ चुंबन घेऊन ती म्हणाली,

'मी या मस्तकाबरोबर सती जाईन !'

" म्हातारे ब्राह्मण म्हणाले,

'पोरी ! तुला याची शेवटची इच्छा कळली आहे काय ?'

'काय ?'

'जेव्हा ते हत्यारबंद लोक त्याला घरातून बाहेर ओढीत घेऊन जाऊ लागले, तेव्हा तो म्हणाला,

'तिला म्हणावें, मला अग्नि दे, आणि मथुरेला जाऊन गोविंदलालाला तुझीं भजनें ऐकवायची इच्छा अपुरी राहिली !'

" साहस करून मुलीनें विचारले,

'ते हत्यारबद लोक कोण होते ?'

'मुली, तें विचारू नकोस !'

'नाहीं ! आपणाला तें सांगावे लागेल !'

" क्षणभर थांबून आवंढा गिळीत वृद्ध म्हणाले,

'पोरी, ते तुझ्या वाड्याच्या देवडीवरील पहारेकरी होते ! अंगणात त्यानीं पोराचें जे काय केले, तें तुझ्यासमोर आहे ! पोरानें अत्यंत शूरपणानें मृत्यूला आलिंगन दिले ! तोंडातून चकार शब्द न काढता !'

"थोड्या वेळाने मुलगी तें मस्तक घेऊन उभी राहिली आणि वृद्धाना म्हणाली,

'बाबा ! तुम्हाला विवाहमन्त्र येतात ना ?'

'कशाला पोरी ?'

'कशाला ? आता अशा वेळीं मी ब्राह्मण कुठें शोधूं ?'

"आणि अशा रीतीनें त्या मुलीचा आपल्या प्रियकराशीं विवाह झाला ! साक्षी होते वृद्ध, मोलकरीण, धडाधडा जळणाऱ्या चिता आणि गंगामाई !"

माई काहीं वेळ गप्प बसली आणि नंतर डोळे पुसत म्हणाली,

" भैय्या, तू ऐकला आहेस असा विवाह ? "

जगन्नाथानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. उत्तर देण्याच्या मनःस्थितींत नव्हताच तो. माई पुढें बोलू लागली,

" नसशील ऐकला ! तूं मघा जे प्रेमाचें वर्णन केलेंस, त्यातल्या विषानें आपले सामर्थ्य अशा विकट रीतीने अनुभवास आणून दिले ! त्यानतर तें भेसूरपणे हसत त्या मुलीसमोर उभें राहिले आणि म्हणालें,

" आता ? पराभव झाला ना तुझा ? "

जगन्नाथानें उन्मनी अवस्थेतून जणू जागे होऊन कुठे तरी नमस्कार करीत विचारले,

" मग तूं काय उत्तर दिलेस माई ? "

" होय भैय्या ! ही माझीच कथा आहे. मी उन्मन होऊन त्या विषाला म्हणाल्यें,

' नाहीं ! तूं माझा पराभव करूं शकला नाहींस, शकणारहि नाहींस ! मी ताठरपणानें जगेन ! तुला पचवीन मी ! तुझ्या उत्तरागाच्या बळावर मी अमर होऊन जगाला सागेन, मी ब्राह्मणी आहें ! एका अति पवित्र ब्राह्मण कुमाराशीं मी गगा आणि अग्नि याच्या समोर विवाहबद्ध झाल्यें आहे !'

"त्यानतर—"

पुनः माई थाबली. जगन्नाथ म्हणाला,

" काय माई ? "

" त्याचे दहन उरकल्यावर आम्हीं काशी सोडली ! त्याचें श्राद्ध केलें मथुरेला ! रोज मी श्रीहरीला भजनें ऐकवायची. दोन महिने तिथे काढल्यानतर मामंजी म्हणाले,

' मुली, चल आता वृदावनाला जाऊं. '

" वृदावन, गोकुळ. अयोध्या, गया, प्रयाग, हरिद्वार अशीं नाना तीर्थे हिंडत आम्हीं पधरा वर्षे घालविलीं. परवां इथे आलो ते जणू तू भेटायचा होतास म्हणूनच ! "

जगन्नाथ उठला, आणि हात धुऊन तो माईला म्हणाला,

" माई, एकदा तुझ्या पायाची धूळ माझ्या स्मतकीं लावूं दे ! "

" असें काय करतोस भैय्या ! "

" काय करतों ? तुला गुरु केलें आहे मीं आजपासून ! "

" मी काय शिकवूं शकेन तुझ्यासारख्या दिग्गज पंडिताला ? "

" काहीं शिकवूं नकोस. मला काय शिकायचे ते मी शिकेन ! एवढीं वर्षे अनेक गुरु करून आणि अनेक विद्यार्थ्यांना शिकवून शेवटीं आज मला काय शिकलें असतां जीवन धन्य होते, ते कळलें आहे !

" तुझ्या पायाजवळ बसून मी प्रेमाचे पाठ घेईन ! ज्या अपूर्व निष्ठेनें तूं आपल्या पतीवर प्रेम केलेस आणि ज्या अपूर्व तृप्तीने आज तू एखाद्या तुडुंब भरलेल्या जलाशयासारखी तृप्त आहेस, ती निष्ठा आणि तृप्ति यातला एक कणहि जर मला मिळूं शकेल, तर माझे जीवन धन्य होईल ! "

खालीं वाकून जगन्नाथाने माईच्या पायाला हात लावला आणि मोठ्या श्रद्धेनें तो आपल्या कपाळाला लावला. डोळ्यातून गळत असलेलीं अनिर्बंध आसवे घळघळा खालीं टिपकत असलेली माई म्हणाली,

" भैय्या, दैवाने या जन्मीं मी थोरली बहीण झालें आहें ! तुला आशीर्वाद देत्यें, कीं तुझे जीवन धन्य होईल ? विष आणि अमृत अशीं दोन्ही रूपे ल्यालेल्या प्रेमाचा तुला साक्षात्कार होईल ! "

जगन्नाथ भान हारपल्या अवस्थेतच रामबागेतून राणा जौहरसिंगजींच्या वाड्यात परतला, तोंपर्यंत बरीच रात्र झाली होती. त्याची वाट पहात एक शाही जासूद आणि एक दासी ताटकळत बसली होती.

" काय आहे ? "

" खत धाडले आहे."

" कुणीं ? "

काहीं न बोलता त्या दासीनें आपल्या हातांतील सोन्याच्या ताटावरील मखमली आवरण दूर केले. जगन्नाथाने न्याहाळून पाहिलें.

त्या ताटात एक कमलपत्र ठेवले होते !

आश्चर्यानें तें कमलपत्र उचलून जगन्नाथानें दिव्याजवळ नेलें.

त्याच्या वरील भागावर कोरले होतें, " श्रीचरणेषु " आणि मधील भाग मोकळा सोडून खालीं अक्षरें होतीं, " इति । दासी लवगी ! "



## .८.

दुसरे दिवशीं एवढ्या लवकर जगन्नाथ पुनः रामबागेकडे येईलशी माईला अंशमात्रहि कल्पना नव्हती. ती विहिरीवर स्नान उरकून ओले-त्याने धर्मशाळेत परतते आहे, तों तिला तो विचारमग्न स्थितींत कुठेतरी पहात झपाझप पावलें उचलीत इकडे येताना दिसला. आश्चर्यानें तिने हाक मारली,

" भैय्या ! "

जागा झाल्यासारखा जगन्नाथ म्हणाला,

" होय माई ! मी आलों आहें ! "

" ये ये भैय्या ! बैस ! मी आता आल्यें."

विमनस्क जगन्नाथ देवळाच्या चौथऱ्यावर बसला. वस्त्र बदलून ओल्या केसाची गाठ मारीत माई येताच तो म्हणाला,

" माई, जीवनातील एका अद्भुत पर्वाची नांदी सुरू झाली आहे ! "

" नांदी ? "

" होय. आणि नांदीगीत गायचें काम सोंपविलें गेलें आहे एका कमलपत्राकडे ! "

" कमलपत्र ! "

" थाब. "

जगन्नाथानें उपरण्यांत नीट गुंडाळून आणलेलें तें कमलपत्र तिच्या हातीं दिलें. तें पाहून ती म्हणाली,

" हें तर कोरेंच आहे रे !"

" हें विधान संपूर्ण सत्य नव्हे."

कोमेजलेल्या कमलपत्रावर कोरलेला मायना आणि खालीं लिहिलेलें नाव हीं दोन्ही पुसट होऊ पहात होतीं. तीं माईला दाखवून जगन्नाथ म्हणाला,

" यावेगळे सर्व पत्र मात्र कोरे आहे !"

आश्चर्यचकित माई म्हणाली,

" हे कोणाकडून आलें आहे ?"

" शाही महालातून !"

" आश्चर्य !"

काहीं क्षण विचार केल्यावर एकदम माईला कांहींतरी आठवलें. चुटकी वाजवून ती म्हणाली,

" कळले भैय्या !"

" काय ?"

टाळ्या वाजवीत माई खोड्याळपणें गाऊं लागली,

मोरे भैय्याके अगनमे दुलहन ठाडी ॥

" माई, मी रागावेन बरें का ! तुझे गाणें मला आता अगदीं विषवत् वाटू लागले आहे !"

तोंडावर हात ठेवून गंभीरपणें माई म्हणाली,

" एवढ्यात ? अजून सोहागरात तर खूप दूर आहे !"

" माई !" सक्रोध दृष्टीने तिच्याकडे पहात जगन्नाथ म्हणाला, "तुला पठाण सरदाराच्या तावडींतून उगीच सोडविली, असे वाटूं लागलें आहे मला !"

" अरी भैय्या री ! एवढा घुस्सा !"

" घुस्सा नाहीं तर काय ? मी अगदीं गोंधळून गेलों आहे ! हें पत्र देऊन यापरता एक शब्दहि न सांगतां शाही जासूद आणि दासी परत गेलीं.

कमलपत्र हें प्रेमाचें प्रतीक, एवढें मला कळलें. पण हें कसें ? कां ? कोणा-कडून ? लवंगी कोण ? ”

स्मिताने ती रम्य सकाळ अधिकच प्रियदर्शिनी करीत माई म्हणाली,

“ भैय्या ! ऐक. दिल्लीच्या मार्गांतून भीक मागत असता जें ज्ञान मीं प्राप्त केलें, त्याचा लेशमात्र मी तुला मोठ्या औदार्यानें दान करतें. तो तूं ग्रहण कर.

“ या ज्ञानानें तुझा प्रपंच सुखाने परिपूर्ण होऊन तुला इहपरलोकीं नाना प्रकारचे—”

“ माई, तू माझा असा अन्त पाहणार असशील तर तूं बांधलेली राखी तोडून टाकून मी या क्षणीं चालता होईन बरें का ! ”

“ भैय्या री ! खरें कीं काय ? तर मग ऐक. लवंगी ही शहाजहॉंची मानसकन्या. ”

“ मानसकन्या ? ”

“ होय. शिकारीहून परत येताना ती त्याला सापडली. तेव्हापासून त्यानें तिला आपली कन्या मानून वाढविलें आहे. ”

“ माझी आत्या शोभेल इतके तिचे वय आहे ना ? शहेजाद्याचीं वयें अधिक असतात म्हणून विचारतों. ”

“ज्ञानेच्छु विद्यार्थ्यानें असल्या वात्रट शंका विचारूं नयेत ! लवंगी नुकती कुठे तारुण्याच्या प्रांतात पदक्षेप करीत आहे. ”

“ तिला पाहताक्षणीं संसार विषमय वाटून विरक्ति निर्माण होईल, इतकी कुरूप आहे ना ती ? ”

“ आता अधिक द्वाडपणा करशील, तर मी माझा मोठेपणाचा अधि-कार वापरून कान पिळीन बरें का ! ”

“ नाहीं. आता नाहीं मधे बोलायचा. पाहिजे तर ध्यानस्थ बसतों. चालूं दे तुझे लवंगीपुराण ! ”

“ ऐक तर. लवंगीच्या सौंदर्याविषयीं मीं बरेंच ऐकले आहे. ती अत्यंत सद्गुणी, सुशील, काव्यप्रेमी आहे असा प्रवाद आहे. ”

“ माई, एक विचारूं का ? ”

" विचार. एक प्रश्न विचारायची अनुज्ञा देतें मी तुला. "

" हिने आजपर्यंत आणखी कितीजणाना प्रेमपत्रें धाडलीं आहेत ? "

गभीर होऊन माई म्हणाली,

" भैय्या ! आता मात्र मी खरोखरीच तुझ्यावर रागावेन हं ! तुला शंका घेण्याजोगी जागा नाहीं असे नाहीं. शहेजाद्याचीं प्रेमप्रकरणे सगळ्या दिल्लींत गाजलीं आहेत. कर्णोपकर्णीं अधिक विस्तार पावत तीं तुझ्यापर्यंत पोचलीं असतील तरी त्यात काहीं आश्चर्य नाहीं. पण लवंगीविषयीं मीं अगदीं वेगळे ऐकले आहे. "

" पण दंतकथावर जरा कमी भरंवसा करावा नाहीं का ? "

"भैय्या, अरे तिची रुचि तर पाहशील ! शकुंतलेच्या पावलावर पाऊल टाकून जिने कमलपत्र तुझ्याकडे धाडले, तिच्या एकान्त, विशुद्ध प्रेमाबद्दल तुला सदेह वाटतो ? "

" तरी पण—"

" थाब, मला पुरते बोलून घेऊं दे. ते पत्रहि किती चातुरीने लिहिले आहे बघ ! वर कोरलेन्, श्रीचरणेषु ! आणि खालीं, इति । दासी लवगी. बाकी सर्व पत्र कोरें ! आशय किती मधुर आहे तिचा ! ती आपले मोकळें हिमधवल अन्तःकरण संपूर्णपणे तुझ्या चरणीं समर्पित करू इच्छित आहे—ज्यावर आजपर्यंत कुणीहि एक रेघहि ओढू शकला नाहीं, असे ! "

काहीं क्षण थाबून जगन्नाथ म्हणाला,

" पण माई, ती यवनी आहे—"

" होय. मग ! "

" नव्हे. आमचे आचारविचार, दारिद्य—"

" भैय्या, व्यर्थच एवढा पण्डित झालास ! अरे, काल जें प्रेमाविषयीं प्रवचन केलेस तूं, ते केवळ पुस्तकी ज्ञानच का होतें ! या पलीकडे काहींच अर्थ नव्हता त्याला ? जातीचीं बंधनें हीं केवळ पोरींच्या घरकुलाच्या भिंती आहेत, शुद्ध प्रेम जात ओळखीत नाहीं—"

" ऐक माई, माझ्यावर अन्याय करूं नकोस असा. तूं म्हणत्येस तें खरें आहे. माझें ज्ञान कदाचित् पुस्तकीहि असेल. पण तें ज्ञान अपरोक्ष अनु-

भूर्तीचा विषय व्हावे अशी माझी नितराम् इच्छा आहे. मानवी जीवनात जर प्रेमाचा ओलावा नसेल तर त्याचे ओसाड वाळवंट व्हायला क्षणाचा अवधि कांहीं लागायचा नाहीं. सुदैवाने माझ्या जीवनात प्रेमानें बन्धु-प्रेमाचा आकार लेवून दोन स्त्रियाच्या रूपानें प्रवेश केला. एक दुर्गाम्बा, दुसरी तूं. आता तें एका नवीन आकाराने अवतीर्ण होऊं पहात आहे.

" पण त्याचें हें रूप फसवें असलें तर ? प्रेमापुढें जातीचीं बधनें हीं मेघमालेच्या भितीसारखीं आहेत. पण तें प्रेम विशुद्ध नसेल तर ?

" मी माझी फसगत करून घेऊ इच्छीत नाही.

" म्हणूनच मी तुझ्याकडे आलो आहें. तूं या आपल्या धाकट्या भावाला आयुष्यातील एका अति महान् मधुर गंभीर अंकास प्रारंभ होत असता साहाय्य करणार नाहींस ! "

" करीन रे करीन ! मोठ्या सतोषाने करीन ! मी तुझी थोरली बहीण झाल्यें कशासाठीं ?"

जगन्नाथाने आंसवे पुशीत माईच्या पायास स्पर्श केला.

प्रहरभर दिवस वर आला, तेव्हा माई हातीं भिक्षापात्र घेऊन शाही-महालाच्या परिसरात प्रवेशली. पहारेकरी पठाण कुजबुजले,

" यही है वह बला ! "

" यही है ? तब तो सालीको—"

" चुप ! फटके खावे लागतील भर चौकात ! जाऊ दे ! "

कांहीं अडथळा न होता ती महालाजवळ आली. एक लौंडी हातातील चादीच्या बागड्या चाळवीत वाटेने चालली होती. तिला माई म्हणाली,

" देव तुझे बरे करो ! तू कुणाच्या महालात असत्येस बाई ? "

" झीनत बेगमच्या. "

" तो महाल कुणाचा ? "

" तो बेगम मुमताजचा. गेली बिचारी—! "

" तो पलीकडील ? "

" शहेजादी सलीमा राहात्ये तिथें. "

" आणि हा ? "

" अम्माजान मेहरुन्निसाचा."

" तूं फार चागली आहेस बाई. लवंगी कुठें राहात्ये ?"

" लवंगी ? शहेजादी लवंगी ?"

" होय."

" ती अम्माजान मेहरुन्निसांच्या महालातील एका भागात राहात्ये. कशाला हवी आहे ती तुला ?"

" तिला गाणीं फार आवडतात म्हणे. काहीं भिक्षा मिळाली चार गाणीं गाऊन, तर पाहीन."

" तुला गाणीं गाता येतात ?"

" हो ! येतात कीं !"

" तर मग गाऊन दाखव पाहूं एक !"

" इथे रस्त्यावर ? माझें एक राहूं दे ! पण तुझ्यासारख्या झीनत-बेगमच्या दासीला रस्यावर गाणे ऐकणें बरें दिसेल का ?"

" हो कीं ! हे माझ्या लक्षातच आलें नव्हतें ! चल, तुला शहेजादी लवंगीकडे घेऊन चलत्यें !"

लौंडीच्या पाठोपाठ महालांमागून महाल मागें टाकीत माईनें लवंगीच्या महालांत प्रवेश केला.

लवंगी कठड्यावर कोंपर टेकून उभी होती.

तिचे सुंदर केंस विंचरले नसल्यानें उनाडपणे इकडे तिकडे बागडत होते. अंगावरील तलम, अत्यंत साधीं वस्त्रें तिच्या नाजुक शरीरयष्टीला अधिकच शोभादायी झालीं होतीं. आतुर मुद्रेनें ती कुठें तरी पहात होती.

" शहेजादी—" लौंडी म्हणाली.

लवगी इकडे वळली, तों तिला लौंडीच्या मागें माई दिसली. काहीं क्षण दोघीहि एकमेकींकडे पहात राहिल्या. मग गोडसें हंसून माई म्हणाली,

" शहेजादींना गाणीं फार आवडतात, असें ऐकलें म्हणून आल्यें आहें."

घाईघाईनें पुढें होऊन लवंगीनें माईचा हात धरला, आणि तिला आग्रहानें ओढीत ती म्हणाली,

" समजलें मला !"

" काय ? "

" त्या दिवशीं दरबारांत झालेलें प्रकरण तुम्हामुळेंच—"

" होय शहेजादी ! "

आपल्या आसनावर माईला बसवायचा प्रयत्न करीत लवंगी म्हणाली,

" बसा कीं ! "

आपला हात सोडवून खालीं बसत माई म्हणाली,

" असूं दे. इकडेच बसत्यें. "

" तर मग मीहि खालींच बसत्यें. " माईसमोर बसून लवंगी म्हणाली, " तुम्ही एवढें चागले गायला कुठें शिकलात ? "

" मथुरेला. "

" गुरु कोण तुमचा ? "

" गोपालकृष्ण ! "

विश्वास ठेवायचा प्रयत्न करीत लवंगी म्हणाली,

" तुम्हाला काहीं अडचण वाटत नसेल, तर एखादे गीत गाल का ?"

" तेवढ्यासाठींच आल्यें आहे. "

लवंगी माईशीं एवढ्या सलगीनें वागत्ये, हें पाहून बावरलेली लौंडी हळूच महालाबाहेर सटकली. माईने एकतारीचा स्वर मिळवून गीत सुरू केलें.

कृष्ण सखा गोविंद
जय जय, राधाधरमधुमिलिंद ॥

भैरवाचे स्वर चहूंबाजूंस पसरत अगदीं सहजपणें वातावरणाच्या अतरात मिसळले. महालाच्या भिंतींवर वारवार प्रतिध्वनित होऊन त्या स्वरानीं भैरव रागाचें अगोचर स्वरूप मोठ्या दिमाखानें लवगीच्या दृष्टीला गोचर केलें.

हातावर हनुवटी टेकून त्या स्वरविस्तारानें थक्क झालेली लवंगी माई-च्या तोंडाकडे पहात राहिली. गाणें थांबलें, तेव्हा एक श्वास सोडून ती माईला म्हणाली,

" असें मला येतें तर ! "

माईच्या मुखावर स्मितरेषा उमटली. तिनें विचारलें,

" काय केलें असतेंत ? "

" मीहि अशीच गायल्यें असत्यें. "

" प्रियकरासमोर ? "

तत्क्षणीं लवंगीचें मुख लज्जेनें आरक्त झालें. तिच्या कानातील मोत्याचीं कर्णभूषणें त्या लालिमेवर मोठीं शोभून दिसलीं.

" आणखी एक गाणें म्हणू ? "

" हो हो ! म्हणा ! "

" कसले म्हणूं ? "

" कसलेहि म्हणा. "

" माझ्या प्रियकराचें म्हणत्यें. "

" तुम्हालाहि प्रियकर आहे ? "

" का ? दरिद्री माणसाला प्रियकर नसतो ? "

" छे छे ! तुम्हाला राग आला ! मी म्हणत होत्यें तुमच्यासारख्या विरागिनीला—"

माई हंसली. ती म्हणाली,

" ऐका. माझा प्रियकर मोठा विद्वान् पण्डित आहे."

" नाव काय त्याचें ? "

" ते गीत ऐकल्यावर कळेल. "

माईने जोगियाचे मधुर स्वर विस्तारले, आणि गीत सुरू केलें,

नयनमनोहर यदुकुलनंदन
दिसला मज साजणी
त्या क्षणीं मन गेलें मोहुनी ॥ धृ० ॥

द्रौपदिसाठीं धांवुनि आला
वस्त्ररूप मम प्रियतम झाला
घन:श्याम हरि राजिवलोचन
पाहियला लोचनीं ॥१॥

कैवारी सखि हा पतिताचा
जगन्नाथ हा नाथ जगाचा
सद्‌गुणसागर त्रिभुवनसुंदर
वसला माझे मनीं ॥२॥

तन्मय झालें अवघें तनमन
धन्य जहाले माझें जीवन
सार्थक झालें या देहाचें
तच्चरणीं वाहुनी ॥३॥

गीत गात असता माईचें लक्ष लवंगीच्या मुखाकडे होतें. गीतात जगन्नाथाचें नाव निघताच गीताशीं तन्मय झालेल्या लवंगीची मुद्रा खर्रकन् उतरली. गीत संपल्यावर माई हंसत म्हणाली,

"आवडलें गाणें ?"

म्लान लवंगी म्हणाली,

"हो !"

"आणखी एक गाऊं ?"

"नको !"

"अगबाई ! तुम्हाला हें असें काय झालें ?"

"कुठे ? काहीं झालें नाहीं."

काहीं क्षण गप्प बसून नंतर मोठ्या कसोशीनें लवंगी म्हणाली,

"हें गीत कुणीं केलें ?"

"माझ्या प्रियकरानीं."

"ते कवि आहेत ?"

"होय. नुसते कविच नाहींत, फार मोठे पंडित आहेत."

"पण्डित ?"

"होय. केवळ संस्कृत भाषाच नव्हे, तर फारसी–अरबीहि त्यांच्या जिव्हाग्रीं खेळत्ये. परवां दरबारांत माझ्यासाठीं वाद खेळून त्यांनीं माझी सुटका केली !"

मेघाच्छन्न आकाशाप्रमाणें लवंगीचें मुख अगदीं काळंजून गेलें. पटकन्

ती उठली, आणि कशीबशी स्वतःला सांवरीत पुनः कठड्याजवळ जाऊन उभी राहिली. तिने आपलें तोड हातात खुपसलें.

काहीं वेळ वाट पाहून माई म्हणाली,

" आता तुमची प्रकृति बरी नाहींशी दिसत्ये. पुनः कधीं येईन मी गाणें ऐकवायला."

एकदम मागें वळून लवंगी भरलेल्या स्वरात म्हणाली,

" तुम्हाला माझी कसम आहे ! जाऊं नका ! "

वारंवार डोळ्यातून बाहेर धावणारीं आसवे पुशीत लवंगी माईच्या जवळ आली, आणि म्हणाली,

" तुमची ओळख कधींपासून आहे ? "

" कुणाशीं ? "

" तुमच्या—तुमच्या प्रियतमाशीं ? "

" खूप दिवसापासून आहे. त्यानीं पहिल्या पत्नीला टाकलें होतें, तेव्हापासून."

रुद्ध कंठानें लवगीनें विचारलें,

" त्याना पहिली एक पत्नी आहे ? "

" होय. पुनः ती काळतोंडी त्याच्याजवळ येऊन राहिली आहे."

" आणि तुम्ही ? "

" मी ? " आपलें हसूं दाबायचा आटोकाट प्रयत्न करीत माई म्हणाली,

" वा ! वा ! आपल्या प्रियकराच्या भेटीचीं गुपितें कुणाला सांगायचीं नसतात ! "

खालीं तोंड घालून लवंगी मुकाट्यानें बसून राहिली. तिच्या नेत्रांतून गळणाऱ्या आसवानीं खालची संगमरवरी फरशी भिजून गेली. थोड्या वेळानें माई म्हणाली,

" येऊं आता मी ? "

रडून लाल झालेले आपले डोळे पुशीत लवंगी निर्धारानें जणूं स्वतःशींच बोलली,

" चालेल मला ! मी दोघींचीहि दासी होऊन राहीन ! "

" मला म्हणालांत कांहीं ? "

एकदम लवंगीनें माईचे दोन्ही हात धरले, आणि ते आपल्या छातीशीं आवळीत ती म्हणाली,

" माझी एक प्रार्थना ऐकाल का तुम्ही ? "

" प्रार्थना ऐकल्यावर मग निर्णय देईन. "

" हो म्हणा हो ! हो म्हणा ! "

" थोडा वेळ म्हणत्यें. करा प्रार्थना. "

" तुम्हा दोघींचीं वस्त्रें धुवीन मी ! भाडीं घाशीन–"

" वेतन काय घ्याल ? "

" काहीं नाहीं. "

" पण हें धुणीं धुणें आणि भांडीं घासणें तुमच्याच्यानें व्हायचें नाहीं. आम्ही तुम्हाला ठेवणार नाहीं ! "

" ठेवा हो ! काय पडेल तें काम करीन मी ! "

" पाय दाबाल ? "

" हो ! दाबीन. "

" मी झोंपल्यावर मला वारा घालाल ? "

" हो ! घालीन. "

" चुकारपणा केलात तर काढून टाकीन ! "

" नका ! तेवढें करूं नका. "

मोठ्या गभीरपणें माई म्हणाली,

" बरें आहे. मी तुम्हाला निभावून नेईन. पण माझी सवत मोठी द्वाड आहे. "

" असूं दे. "

" ती तुम्हाला छळील. "

" छळू दे. मी सोशीन. "

" उपाशी ठेवील—"

" मी उपाशी राहीन. "

" तुम्हाला संवय नाहीं ! "

" मी सवय करीन. "

" आजपासून– "

" हो ! आजपासून ! "

" ठीक आहे. मी तुमची शिफारस करून पाहीन तिच्याजवळ. "

" एवढें कराल, तर मी जन्मोजन्मीं तुमची ऋणी होईन ! "

" पण हें सुख सोडून या आपत्तींत उडी घ्यायची दुर्बुद्धि तुम्हाला का आठवली ? "

काहीं क्षण थाबून लवंगी थरथरत म्हणाली,

" मला—मला ते हवे आहेत ! "

" कोण ? "

" तुमचे–माझे प्रियतम ! "

मुद्रेवर आणवेल तेवढा क्रोध आणीत माई म्हणाली,

" माझ्या सवती ! "

लवंगी कोसळून माईच्या पायांवर पालथी पडली, आणि मुसमुसून रडूं लागली. हुदके देत असताच ती म्हणाली,

" नका हो ! मला असें दूर लोटूं नका ! मी केवळ त्यांचें मुख पाहूनच समाधान मानीन ! मला याहून अधिक काहीं नको ! तुमच्या घराबाहेर पडून राहीन मी. घरातसुद्धा यायची नाहीं ! एवढी––ही एवढीच अनुज्ञा द्या मला ! पाहिजे तर मी त्याच्या समोर येणारहि नाहीं ! "

" कधींच ? "

आवेग दाबीत लवंगी म्हणाली,

" होय ! कधींच येणार नाहीं ! काय म्हणाल ती अट मान्य करीन मी ! पण त्याचे श्रीमुख पाहूं देण्याचा हा एवढा अनुग्रह करा माझ्यावर ! "

" न केला तर ? "

" तर ? तर—तर—जर हें एवढेंहि करवत नसेल तुमच्याच्यानें, तर मग तुमच्या प्रियतमाला माझा एक निरोप तरी पोचवा ! "

" काय ? "

" त्यांना सांगा, कीं—

" कीं एक कमलिनी चंद्रबिंबाची वाट पहात होती !

" पण दुर्दैवाने त्या अभागिनीच्या नशिबीं चन्द्रदर्शन नव्हतें !

" म्हणून ती कोमेजली ! "

माईचे पाय सोडून लवगी धरणीवर कोसळली. भावनाना शक्य तितका आवर घालीत माई म्हणाली,

" हा निरोप त्याना सागितला, तर ते काय करतील ? "

लवंगी उठून बसली. भावाविष्ट नेत्रानीं माईकडे पहात ती म्हणाली,

" ते कवीचें हृदय घेऊन जन्मास आले आहेत. माझ्या कबरीजवळ हळुवार पावलानीं येऊन ते माझ्यासाठीं दोन बहुमोल आसवें वाहवतील !"

" मी हा निरोप स्वतः सागणार नाहीं."

" मग ? "

" मी तुमची आणि त्याची एकदाच भेट करवून देईन ! "

अंगीं चेतना संचरून लवंगी उभी राहिली, आणि माईचे बाहु धरून म्हणाली,

" काय म्हणालात ? "

" होय. एकदाच—"

" केव्हां ? "

" आज रात्रीं."

" कुठें ? "

" रामबागेंत बकुळीच्या झाडाखालीं याल ? "

" होय ! या येण्यासाठीं मी वेळीं माझ्या प्राणाचेंहि मोल देईन ! "

लवगीच्या बाहुपाशातून कशीबशी आपली सोडवणूक करून घेत माई बाहेर पडली.

रात्रीं जगन्नाथ रामबागेंत शिरला, तेव्हां चन्द्रोदय होऊन गेला होता. धर्मशाळेबाहेर माई त्याची वाट पहात होती.

" कशाला बोलाविलेंस माई ? "

" काम आहे."

" कसलें काम ? "

" मोठ्या माणसांनीं काम सांगितल्यावर मुलांनीं चवकश्या करायच्या नसतात. त्या बकुळीखालीं जाऊन बस. मुकाट्यानें. ध्यान धरून."

" कुणाचें ? "

" विषाचे. प्रेमाच्या अर्धांगाचें."

जगन्नाथ झाडाखालीं बसला. प्रहर रात्र उलटून गेली. माईला वस्त्राव-गुंठित लवंगी एका दासीबरोबर येताना दिसली. तिच्याजवळ जाऊन माई तिच्या कानात म्हणाली,

" मीं सकाळीं सांगितलें ते सगळे खोटें. तुझा प्रियतम केवळ तुझाच आहे ! तुझा एकटीचा ! "

थरथरत असलेल्या लवंगीला हातानें धरून माई बकुळीच्या झाडाखालीं घेऊन गेली. जगन्नाथास हाक मारून ती म्हणाली,

" भैय्या ! सांभाळ ही तुझी वस्तु."

जगन्नाथ पुढें झाला. त्याला पाहताच लवंगी माईच्या करपाशांत शुद्ध हारपून कोसळली.



# ९.

शुद्धीवर येताच लवंगी अनिमिष नेत्रांनीं जगन्नाथाच्या मुखाकडे बघूं लागली. लाज नाहीं, भय नाहीं, संकोच नाहीं.

जगन्नाथहि भान हरपून तें ईश्वरनिर्मित सौंदर्य अतृप्त नेत्रांनीं जणूं पिऊं लागला.

शुद्ध त्रयोदशीचा चंद्र आकाशाच्या मध्यभागीं उभा राहून त्या युगुलाच्या प्रथम मीलनाचा साक्षी झाला होता. त्याचें चादणें बकुळीच्या शाखामधून खालीं गळत होतें. त्या चादण्याच्या प्रकाशात दिवसा सामान्य दिसणाऱ्या प्रत्येक वस्तूला एक अलौकिक शोभा आली होती.

सामान्य वस्तूला सौंदर्याचें प्रदान करणारें तें चादणें लवंगीच्या मुखावर द्विगुणित होऊन खालीं सांडत होतें.

जगन्नाथानें कालिदासाची शकुंतला कठगत केली होती. पार्वतीच्या सौदर्याचे वर्णनहि त्यानें अनेकदा विद्यार्थ्यांस शिकविले होतें. पण तें कविवर्णित सौंदर्य प्रत्यक्ष दर्शनाचे वेळीं एवढें मनोहारि होऊं शकतें ही गोष्ट आजपर्यंत जगन्नाथाच्या ध्यानींच आली नव्हती.

कलाकाराच्या दृष्टीने वेड्यासारखा तो लवंगीच्या मुखाकडे पाहात राहिला.

माई हळूच बाजूला झाली. तिचे जाणें कुणाच्याहि लक्षात आले नाहीं.

कांहीं क्षणानतर लवंगी भानावर आली, आणि लज्जेनें आरक्त होऊन

तिनें तोंड खालीं वळविलें. आकाशात चंद्र प्रकाशत असून देखील पृथ्वीवरील मुखचन्द्र दिसेनासा झाला.

जगन्नाथाला आपण काय करीत आहोंत, तें कळलें नाहीं. तो पटकन् लवगीजवळ गेला, आणि त्यानें तिचें मुख आपल्या हातांनीं उचलून चन्द्रप्रकाशात धरलें !

थरथर कापत असलेल्या लवंगीनें एकदां त्याच्याकडे पाहिलें, आणि आपला सर्व भार त्याच्या अंगावर टाकीत डोळे मिटून घेतले. तिचा उष्ण, मधुर श्वासोच्छ्वास जगन्नाथाच्या शरिरावर रोमांच उभे करूं लागला.

वेलीला लीलया अंगावर वागविणाऱ्या वृक्षाच्या अभिनिवेशानें जगन्नाथानें लवंगीचा भार अगदीं सहज तोलून धरला. तें जाणवताच लवगीने नेत्र उघडले, मधुर स्मित करून एकदां त्याच्याकडे पाहिलें, आणि पुनः पापण्या झाकून ते प्रियदर्शन हृदयात साठविलें.

नवनीतकोमलागी लवगीला हृदयाशीं वागविणाऱ्या जगन्नाथाला वाटलें,

"आज मी पूर्ण पुरुष झालों आहें! पुरुषार्थाचा साक्षात्कार मला झाला आहे!"

तोंच माई खाकरली, आणि म्हणाली,

"वेळ संपली!"

पटकन् लवंगी जगन्नाथापासून दूर झाली. माई त्याच्याजवळ येऊन कृतककोपाने म्हणाली,

"कोण तुम्ही? काय करीत होतात इथें? ही कुणी तरी राजघराण्यातील मुलगी दिसत्ये. आणि हा कोणीतरी मधुकऱ्या! काय रे चोरानो! या पवित्र बागेचा उपयोग अशा गाठीभेटीसाठीं करता काय?"

"माई—!" व्याकुळ होऊन जगन्नाथ म्हणाला.

"मी माई नाहीं. शाही कोतवाल आहे मी! थाबा, तुम्हाला चागली शिक्षा लावत्ये!"

माईनें लवंगीचा दंड धरला आणि तिला आपणाकडे ओढलें. जगन्नाथ आर्जवी स्वरांत म्हणाला,

" असें काय करत्येस माई ? "

" चुप ! तुला काहींहि करीत नाहीं ! जा, तुला क्षमा केली आहे. या पोरटीला मात्र मी शाही तुरुंगात डाबणार आहे ! "

लवंगी विस्मित नेत्रानीं माईकडे पहात राहिली. तें पाहून लटका आवेश टाकून देत माई गदगदा हंसली, आणि लवगीला पोटाशीं धरून ती म्हणाली,

" किती ग छळल्यें मी माझ्या सोनुलीला ! पण आतां घरीं जा. यानंतर भेट दोघाचे लग्न झाल्यावर. समजलें ना ? नाहींतर लोकात चर्चा सुरू होईल. तुझ्यापेक्षा तुझ्या प्रियकराला ती चर्चा हानिकारक ठरेल. त्याला अजून दिगंत कीर्ति मिळवायची आहे. आता मी करत्यें सगळें नीट. विश्वास आहे ना माझ्यावर ? "

" हो ! "

वारंवार मागें वळून पहात हळू हळू लवंगी झाडाच्या सावल्यात दिसेनाशीं झाली.

" आता काय माई ? " हताश जगन्नाथानें विचारलें.

" आता काहीं नाहीं. मुकाट्यानें झोंपायचें. "

" झोंप येणार नाहीं. "

" तर मग जग मिथ्या आहे, हें मनाला पटवीत रहायचें. "

" माई, तूं दुष्ट आहेस ! "

" छान ! जगात कुणाचें बरें करूं नये म्हणतात, तें काहीं खोटें नाहीं! मी जाऊन झोंपत्येंच मुळीं ! "

माई धर्मशाळेकडे निघाली, हें पाहून जगन्नाथानें कळवळून हाक मारली,

" माई, जाऊं नकोस ! तुझ्या पाया पडतो ! "

" पड ! "

जगन्नाथ तसाच बसून राहिला. काय करावें हें त्याला सुचेनासें झालें. ती त्याची अगतिक अवस्था पाहून माई हंसत त्याच्याजवळ आली, आणि त्याच्या खाद्यावर हात ठेवीत म्हणाली,

" वेडा रे वेडा ! अगदींच वेडा हो हा माझा भैय्या ! "

" माई ! "

" चल आतां. आज इथेंच झोंप. यापुढें मी सांगेन तसें वागायचें. तुम्हा दोघांचीं हाडें भाजीन, तेव्हा कुठे मला स्वस्थपणें झोंप लागेल. "

जगन्नाथ माईमागें चालूं लागला.

सहा दिवस गेले. माई कांहींहि बोलेना. सातव्या दिवशीं सायंकाळीं जगन्नाथ रामबागेंत शिरला, त्यावेळीं चांगली थंडी पडायला प्रारंभ झाला होता. मातीच्या आळ्यांत निखारे फुलवून माई शेकत बसली होती. बाबाजी नुकतेच ध्यानासाठीं शिवमंदिरांत गेले होते.

" ये भैय्या ! "

जगन्नाथ मुकाट्यानें जाऊन शेगडीजवळ बसला. माई कौतुकानें त्याच्याकडे पहात स्मित करूं लागली. त्यानें तिच्याकडे पाहिलें, तेव्हां तो म्हणाला,

" इथें हृदय पेटतें आहे आणि तूं हस ! "

" काय काय होतें सांग बघूं ? "

" मी नाहीं सांगत जा ! "

" असें रे काय करतोस ? सांग ! माझा राजा भैय्या तो ! "

जगन्नाथ समोर पहात कांहींसा स्वतःशींच बोलला,

" तें मृदुमधुर हंसूं, ते निःश्वास, तें अत्यंत नयनमनोहर मुख, पद्माचे सहोदर शोभतील असे ते नेत्र, सारेंच हृदयाचा दाह करणारे आहे ! "

आणि अचानक त्याच्या मुखातून श्लोकबद्ध विरहावस्था आकारास आली.

तन्मञ्जु मन्दहसितं श्वसितानि तानि
सा वै कलङ्कविधुरा मधुराननश्रीः ।
अद्यापि मे हृदयमुन्मदयन्ति हन्त
सायंतनाम्बुजसहोदरलोचनायाः ॥

मायेनें पाझरून माई म्हणाली,

" भैय्या ! तुझी ही अवस्था मला कळत का नाहीं ? "

" तुलाहि—? "

" होय भैय्या ! एकदां मीहि अशीच रात्री जागवीत उशीवरील वस्त्र आसवानीं भिजवीत होत्यें. आता तें केवळ स्वप्न झालें आहे. असूं दे. मलाहि हा तुमचा विरहीभाव उमजतो. "

" मग तूं कांहींच कशी बोलत नाहींस ? "

" तवा तापू दे. विरहानतरच्या मीलनात अपूर्व सुख आहे रे ! "

" हा तवा आणखी किती तापणार ? "

" अगोदर मला साग, तूं त्यानंतर पातशहाकडे गेला होतास ? "

" नाहीं. "

" का ? "

" मला कुठें जावेंसेंच वाटत नाहीं माई ! त्रयोदशीच्या रात्रींचें तें मधुर मीलन माझ्या सर्वांगातील चेतना आपणाबरोबर नेऊन केवळ स्मृतींच्या पटावरच अवशिष्ट राहिलें आहे. "

" पण तू एकदां पातशहाकडे जाऊन यायला हवें आहेस. "

" कशाला ? "

" तुम्हा दोघाच्या मीलनास त्याच्या अनुज्ञेची आवश्यकता आहे, हें तुझ्या स्मरणात कसें राहिले नाहीं ? ती त्याची मानसकन्या आहे—"

" मग मी आता काय करू ? "

" आत्ता पातशहाकडे जाऊं शकशील ? "

" हो ! त्याच्या इथे मला मुक्तद्वार आहे—"

" जाऊन ये. आणि उद्या सायकाळीं पुनः जलमंदिरात येईन, असें त्याना आश्वासन दे. "

" कशाला ? "

" तें त्याचें तानमान कळल्यावर सागेन. जर ते तुझ्यावर अजूनहि प्रसन्न असले, तर—पण तें तूर्त तरी गुपितच राहू दे. "

जगन्नाथ तसाच निघाला, तो शाही महालात जाऊन पोंचला. पहारेकऱ्यांनीं आत वर्दी पोंचविली, आणि बाहेर येऊन अदबीनें सागितलें,

" शहेनशाह आपली याद करीत आहेत. "

जगन्नाथ आत गेला. एका पलगावर रजई पाघरून शहाजहॉ बसले होते.

त्याच्या समोर एका तिपाईवर चंदनी लाकडें जळत असलेलें एक लोहपात्र ठेवलें होतें.

" या ! या पण्डितराज ! "

पलंगाशेजारीं एका लौंडीनें एक आसन माडलें. जगन्नाथ त्यावर जाऊन बसला.

" बहुत दिवसांनीं आमची याद आली ? "

खालीं मान घालून जगन्नाथानें म्हटलें,

" असे झालें खरें ! मी सफाई पेश करूं शकणार नाहीं ! "

हसून शहाजहॉ म्हणाले,

" अरे ! पण्डितजी, सफाईची जरूरत नाहीं. लेकिन तुमची तबियत ठीक दिसत नाहीं ! "

" तसें काहीं झाले नाहीं मला ! "

" दिल्लीची थंडी थोडी अधिक असत्ये ! "

" हो. "

" मग ? थडीचा त्रास होतो ? "

" नाहीं ! "

" तुम्ही शाही हकीमाला आपली तबियत दाखवून द्या. आमच्या इथें तुमच्यासारख्याची तबियत खराब व्हावी, हें आम्हाला बरे वाटत नाहीं."

जगन्नाथ मनात म्हणाला,

" माझ्या प्रकृतीच्या अस्वास्थ्याचें औषध देणारा हकीम या शाही महालातच आहे ! "

हातानें डोळ्यात शिरणारा चंदनाचा धूर वारीत शहाजहॉं म्हणाले,

" पण्डितजी ? काहीं सुनवा ना ! "

" काय सुनवू ? "

" काय—हा ! या थडीचीच बहार सुनवा ! "

क्षणमात्र थाबून जगन्नाथ म्हणाला,

" ऐकावें जहॉपन्हा !

" थडीमुळें एखाद्या दरिद्री माणसानें हातपाय आकसून घ्यावेत—

“ तसा दिवस आकसून ल्हान झाला आहे.

“ प्रियतमेने पहाट झाल्यावरहि प्रियकराच्या भोंवतालची मिठी ढिली करूं नये—

“ तशी रात्र आकाशाला आपल्या पाशातून लवकर मोकळें करीत नाहीं.

“ विस्तवाची उष्णताहि थंडीचें निवारण करण्याच्या बाबतींत असमर्थ ठरली आहे.

“ सूर्य हें थंडीचें कौतुक पाहण्यासाठीं एका बाजूला कलला आहे.

“ सगळ्यात सुखी आहात आपण !

“ ज्याच्या हृदयात प्रेमाची ऊब आहे अशा विलासिनींच्या अंतरात आपलें वास्तव्य आहे.

“ शिवाय रजईतला कापूस थंडीला आपणापर्यंत पोंचूं देत नाहीं !

“ आणि सगळ्यात दुःखी आम्ही !

“ ज्याना पाघरायला रजईहि नाहीं !

“ वा प्रेमाच्या उबेंत बसून थंडीचा मोसम घालविता येईल अशी युवतीहि नाहीं ! ”

शीतार्ता इव संकुचन्ति दिवसा नैवाम्बरं शर्वरी
शीघ्रं मुञ्चति किं च तत्र हुतभुक् कोणगतो भास्करः ॥
त्वं चानङ्गहुताशभाजि हृदये सीमंतिनीना गतो
नास्माकं वसनं न वा युवतयः कुत्र व्रजामो वयम् ॥

खोखो हंसून पातशहानीं सगळा महाल निनादून टाकला. दासीहि तोंडावर वस्त्रें धरून हंसूं लागल्या.

“ वा वा ! कमाल केलीत पण्डितराज ! खरोखर कमाल ! आतां तुम्हाला काय देऊं ? ”

“ शहेनशाह आपला शब्द खरा करायला उत्सुक आहेत काय ? ”

“ बेशक ! ”

“ मी मागेन तें मला मिळण्याची शक्यता आहे ना ? ”

" होय पण्डितजी ! आमच्या गळ्यातले तावीज आहात आपण ! काय वाटेल ते--पण थांबा ! "

" काय ? "

" दोन गोष्टी मागूं नका ! "

" कोणत्या ? "

" एक आमच्या डोक्यावरील ताज ! का सांगतों हें ? कळलें ना ? "

" होय."

" का ? "

" पुनः माझें काव्य ऐकून त्याची कदर करण्याचें आपलें सामर्थ्यच मीं मागितल्यासारखें होईल."

" क्या खूब ! बिलकुल ठीक ! आणि दुसरी आमचें मुमताजबेगम-वरील प्रेम ! "

हंसत जगन्नाथ म्हणाला,

" तें तर आपणाजवळ आपल्यालाच मागितल्यासारखें होईल ! "

" बेशक ! अगदीं आमच्या दिलातली बात बोललात पण्डितजी ! तेव्हा या दोन गोष्टी सोडून काहीहि. "

" ठीक आहे. उद्या—"

" उद्या ? "

" होय. उद्या सायंकाळीं शाही चष्म्याजवळ ! "

" बहोत अच्छा. "

" येऊं मी आता ? "

" या. "

जगन्नाथानें लगेच जाऊन माईला ही वार्ता सांगितली, तेव्हा ती अत्यंत प्रसन्न होऊन म्हणाली,

" भैय्या, झाले तुझें काम. "

" काहींच झालें नाही अजून. "

" नाहीं कसे ? झालेंच. उद्या सायंकाळीं जलमंदिरात तुला तुझी प्रियतमा भेटेल. "

दुसरे दिवशीं सकाळीं माई एकतारी घेऊन लवंगीच्या महालात गेल
तिला पाहताच लवंगीचें हारपूं पहात असलेलें चैतन्य जणूं पुनः परत आ
धावत येऊन तिला मिठी मारीत लवगी म्हणाली,

“ बहन ! किती दिवसानीं—”

“ किती वाळलीस ग पोरी ? ”

“ वाळल्यें ? कुठे वाळल्यें ? ”

“ वाळलीस तर काय ! डोळे बघ किती खोल गेले ते ! ”

लवंगीनें आपलें मुख माईच्या छातींत लपविले. तिच्या विस्कटलेल
केसात बोटें फिरवीत माई म्हणाली,

“ हें असें करून चालायचें नाहीं हो ! सागून ठेवत्यें ! ”

“ काय बहन ? ”

“ ही असली हाडकुळी सून मला नाहीं चालायची. मी माझ
भैय्याला सागेन—”

“ काय ? ’!

“ तूं आपली दुसरी पहा म्हणून. ”

“ बहन—!”

लवगी माईच्या वस्त्राशीं उगीचच चाळा करीत राहिली. अन् म
म्हणाली,

“ चल, जाऊं दे मला. ”

“ एवढ्यात ? ”

“ तर ! भिक्षा मागितल्याशिवाय मला कोण जेवूं घालतो ? ”

“ बहन, सगळी दिल्ली तुमच्या स्वरमाधुरीवर कुर्बान होत्ये आहे—

“ पण दिल्ली ही काहीं खायची चीज नव्हे ! ”

“ तुम्ही माझ्या इथें जेवाल ? ”

“ नाहीं ग बाई ! बाबाजी माझ्या पाठींत दाडकें घालतील ! ”

“ बाबाजी कोण ? ”

“ माझे गुरु. असू दे. येत्यें मी. ”

पण लवंगी कांहीं माईचा पदर सोडीना.

" सोड कीं मला ! "।

" तुम्हीं काहीं सांगितलें नाहींत ! "

" काय सांगूं ? ऐक. अलिकडे थंडी पडूं लागली आहे. "

" जा ! "

" बरे. दुसरें सांगत्यें. एका म्हशीला दोन तोंडाचें रेडकूं झालें. "

रडकुडीला येऊन लवंगी म्हणाली,

" मी बोलायची नाहीं अशानें ! "

" नको गऽ माझी बाई ती ! काय हवें आहे तुला ? "

" काहीं चांगली वार्ता—"

" कुणासंबंधीं ? "

लवंगीने मान खालीं लपवली.

" असें असें. भैय्या मथुरेला गेला आहे. "

" केव्हा येतील ? "

" मी काय सांगू ? कदाचित् वर्षानें, कदाचित् दोन वर्षांनीं—"

लवंगी रडूं लागली, असें जाणून माईनें तिचें तोंड वर उचललें आणि म्हणाली,

" हंस बघूं ! हंसलीस तर सांगत्यें चांगली वार्ता ! "

लवंगी खुदकन् हसली. तिच्या हनुवटीला हात लावून माई बोलली,

" ऐक. उद्यां सायंकाळीं तीन प्रहर उलटल्यावर केशरी वस्त्रें नेसून शाही चष्म्याचें पाणी आणायला जा. "

" कशाला ? "

" माझ्या म्हशीला पाजण्यासाठीं ! "

" जा बहन ! "

" मग कशाला म्हणून काय विचारत्येस ? माझ्यावर विश्वास आहे ना ? "

" हो. "

" तर मग उद्यां. तिसरे प्रहरीं. "

दुसरे दिवशीं दुपारीं तीन प्रहराचे टोल पडले, आणि जगन्नाथ शाही चष्म्याच्या दारापाशीं आला. दारीं उभ्या असलेल्या पहारेकऱ्यानें सागितले,

" शहेनशाह आपली याद करीत आहेत."

जगन्नाथ आत शिरताच आश्चर्यानें थक्क झाला !

तेच कमनीय मुख !

जें त्रयोदशीच्या रात्रीं चद्रप्रकाशात अगदीं जवळून पाहिले होतें—

तेच कमलाची शोभा उणी भासविणारे नेत्र—

तें मंद स्मित—

ते उष्ण श्वास—

मनुष्याकार धारण केलेली तीच महाकवींची प्रातिभा—

रंभा—

उर्वशी—

तिलोत्तमा—

नव्हे ! त्याच्याहून आगळें रूप—

जें एकदा हृदयाशीं धरले होते—

तें कुसुम्भावर्णाचीं वस्त्रें लेऊन जणूं त्रिभुवनाची द्युति वाढवीत होतें !

चन्द्रप्रकाशातील रूपापेक्षा शतगुणित होऊन !

मस्तकावर पाण्याचा कुभ होता. त्याला एका हातानें आधार दिल्यामुळें उरप्रदेश किंचित् उचावला होता !

अशी कुरंगनयना लवगी शहाजहॉंच्या जवळ उभी होती. पातशहा तिच्या हनुवटीला हात लावून तिची थट्टा करीत होते.

जगन्नाथ कृतार्थ नेत्रानीं ती शोभा जणूं आपल्या अंतरात साठवून घेऊं लागला.

एवढ्यात लवंगीचे लक्ष त्याच्याकडे गेलें !

आनंदानें ती थिरकली. तिचे मुख आरक्त झालें. दृष्टि खालीं वळली. पातशहा हें पाहून म्हणाले,

" क्यौं बिटिया ! क्या हुवा ? "

लवगीचें मुख अधिकच खालीं गेलें. पातशहानीं समोर पाहिले. त्याना समाधिमग्न जगन्नाथ दिसला. ते हंसून म्हणाले,

" पण्डितजी ! "

जगन्नाथ त्याच आवेशात पुढे झाला. पातशाहाजवळ जाऊन तो बोलूं लागला,

" जहॉपन्हा !

" काल मी मागेन तें द्यावयाचा आपण सकल्प केला होतात !

" आपल्याजवळ अमाप संपत्ति आहे.

" पृथ्वीपतीला लाजवील असें वैभव आपल्या दारीं झुलत आहे.

" आपण कृपाकटाक्ष टाकाल त्या माणसाचे दारिद्य अभ्राच्या सावलीसारखे दिसेनासे होईल, असें आपले औदार्य आहे !

" मागायचें असेल, तर आपणाजवळ, नाहींतर जगदीश्वराजवळ !

" बाकी कोण काय देणार ?

" एका वेळची भाजी होईल, एवढें दान देणाऱ्याजवळ मागणारानें तरी काय मागावें ?

दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा
मनोरथान् पूरयितुं समर्थः
अन्यैर्नृपालैः परिदीयमान
शाकाय वा स्याल्लवणाय वा स्यात्

" तेव्हा याचकाचे मनोरथ पूर्ण करण्याचे सामर्थ्य आणि इच्छा ज्याचे अंगीं आहे, अशा आपणाजवळ मी याचना करीत आहे.

" काय मागू ?

" हत्ती ?

" छे ! त्याना खायला कुठून घालूं ?

" घोडे ?

" छे ! त्याच्यावर बसून मला कोणताहि देश पादाक्रात करायचा नाहीं.

" मग काय ? द्रव्य ?

" द्रव्याचे ठिकाणीं माझी आसक्ति कधींच नव्हती.

" शिवाय मी दरिद्री माणूस तें सांभाळीत कुठें बसूं ?

" मी या सगळ्याहून वेगळी वस्तु आपणाजवळ मागणार आहें !

" जिच्या रूपसंपदेमुळें—

" लाजून—

" चंद्रानें पश्चिम समुद्रात बुडी दिली,

" जिच्या मृदु, मधुर हास्यापुढें—

" कोमेजून—

" अमृत पृथ्वी सोडून स्वर्गात चालतें झालें,

" जिच्या कोमलतेपुढें—

" निष्प्रभ होऊन—

" कमळानीं पाकळ्या मिटल्या,

" अशी ही सुमुखी—

" मस्तकावरील उदककुंभाच्या भाराने जी श्रान्त झाली आहे,

" कुसुम्भावर्णाच्या वस्त्रांनीं जिची शोभा अधिकच वृद्धिंगत झाली आहे,

" ती ही आपली प्रियदर्शिनी मानसकन्या—

" लवंगी—

" मी पत्नीरूपानें ग्रहण करूं इच्छीत आहें !"

न याचे गजालिं न वा वाजिराजि
न वित्तेषु चित्तं मदीयं कदाचित्
इयं सुस्तनी मस्तकन्यस्तकुम्भा
कुसुम्भारुणा मे दृगङ्गीकरोतु ॥

शहाजहाँ डोळे मिटून जगन्नाथाचें भाषण ऐकत होते. तो थांबतांच ते आपल्या आसनावरून उठले, आणि जगन्नाथाजवळ जाऊन जड आवाजांत बोलले,

" पण्डितराज जगन्नाथ ! आज आपण मला फार मोठ्या फिकरींतून मुक्त केलें आहे !

" मीं पाळलेली ही माझी पोर—

" अत्यत रसिक आहे ती. मुद्दाम एक अध्यापक ठेवून मला हिची संस्कृत काव्य शिकायची इच्छा पुरी करावी लागली !

" समोरील दुःखी जीवाचें साधें कण्हणेहि तिच्या डोळ्यात आसवें उर्मी करूं शकते.

" अत्यत सुंदर, मृदुभाषिणी, अशी ही माझी लाडकी पोर—

" जेव्हा तिनें माझ्याजवळ तुम्हावरील तिचें प्रेम प्रकट केलें, तेव्हां एक कष्टसाध्य बाब म्हणून माझ्यासमोर बाबा आदमच्या पहाडाएवढी फिक्र निर्माण झाली !

" पण मीं तिला सागितल्याप्रमाणें तिनें काय प्रयत्न केले कोण जाणे, ती कामयाब झाली आहे.

" तुम्हाला मी मालदार करूं शकतों.

" पण तसे करणें हा तुमचा अपमान आहे.

" तेव्हा प्रपंचाची फिक्र करावी लागणार नाहीं, एवढीच दौलत आणि ही माझी बेटी मी तुमच्या स्वाधीन करीत आहे.

" ये बेटी ! "

दोन पावले पुढे होऊन शहाजहॉनीं आपल्या हातानें लवंगीच्या मस्तकावरील कुभ उतरून खालीं ठेवला, आणि तिला हातीं धरून ते जगन्नाथाजवळ आले. त्यानीं दोघाचेहि हात एकमेकाच्या हातीं दिले !

बाकी सर्व झाले माईच्या इच्छेप्रमाणें. तिच्या आग्रहावरून व्रात्यस्तोमविधि करून लवगीकडून प्रायश्चित्त करविलें गेले. कन्यादान केलें स्वतः पातशहानीं. अत्यत साध्या रीतीनें विवाह साजरा झाला.

एक मुसलमानी हिंदूवर आषक झाली, म्हणून पाठीमागें मुसलमानानीं नाकें मुरडलीं.

एक विद्वान् पण्डित एका यवनीवर भाळला, म्हणून हिंदूंनीं मनोमनीं पण्डिताचें चिंतितां येईल तितकें अहित चिंतिलें.

शाही बागेंत एक लहानसा वाडा होता. तें घर जगन्नाथास आदण

मिळालें. गृहप्रवेश करताना माई हातीं नीराजन घेऊन ओंवाळायला आली. ती लवगीच्या कानाशीं तोंड नेऊन म्हणाली,

" ऐकलेस सूनबाई ! आता चागला मजबूत पिंजरा करून त्यात हें पाखरूं कोंडून ठेव बरें का ! "

" बहन—! "

" छे ग बाई ! बहन काहीं या बाबतींत उपयोगीं पडायची नाहीं. इथें ज्याचा तोच हवा ! "



# . १०.

मात्र ही पिंजऱ्याची युक्ति स्वतः माईच्या बाबतींत असफल झाली.

कायस्थ बहीण, ब्राह्मण भाऊ आणि यवनी पत्नी अशा तीन प्रेमी जीवांचें ते कुटुंब विवाहाच्या सोपस्कारातून मोकळे होते न होते, तो आठ दिवसानीं एका रात्रीं बाबाजी झोंपले, ते उठलेच नाहींत ! अत्यत शात-पणे त्यानीं जीवनयात्रा सपविली.

दिल्लीच्या सत्संगप्रेमी हिंदूनीं मोठ्या समारंभानें बाबाजींची अंत्यक्रिया केली. प्रेतावर पहिली मातीची मूठ टाकली जगन्नाथाने. शोकविव्हल झालेल्या माईला लवंगीनें सावरून धरलें.

धर्मशाळेंत परतल्यावर जगन्नाथ माईला म्हणाला,

" माई, बाबाजी अत्यत शातपणें गेले—"

" होय रे भैय्या ! मला त्यानीं आपली सेवाहि करूं दिली नाहीं ! "

" त्याचे काम सपलें, ते गेले माई ! "

" काम संपलें कसें भैय्या ? "

" तुझ्या पतिदेवामागें तूं अनाथ झालीस, तेव्हां त्यानीं तुला एवढीं वर्षे आपल्या छत्राखालीं आश्रय दिला. आता तुझा भाऊ तुला भेटला. एका नवीन, समर्थ खांद्यावर तुझा भार देऊन ते स्वतः बाजूला झाले ! "

" जन्मभर मी भारच होऊन राहू का रे ? "

" नव्हे माई ! पुरुषाला स्त्रीचा भार होतच असेल, तर तो हातीं

वागविलेल्या छत्राच्या भारासारखा आहे ! आपल्या स्नेहाची पखरण पुरुषाच्या पायतळीं अथरून जी स्त्री त्याला जीवनाच्या रखरखींतला विसावा होते, त्या स्त्रीचा भारहि पुरुष वागवणार नाहीं, तर तो उन्मत्त होईल ! उद्दाम बनेल ! पिसाळलेल्या कुत्र्यासारखा वाटेल त्या वस्तूचे चावे घेत जगताचे जीवन अशक्य करून टाकील. स्त्री हा पुरुषाच्या खांद्यावरील भार आहे, आपल्या इच्छेनें नव्हे, जगदीश्वराच्या.

" पण तो भार आहे, म्हणूनच पुरुष बेताल होऊ शकत नाहीं. तूं ज्या अर्थाने भार शब्द वापरलास, त्या अर्थाने तूं भार मुळींच नाहींस !

" हें मी माझें बोलत नाहीं माई ! तूंच शिकविले आहेस हें ! "

" मी ? "

" होय. तूंच. कोणत्याहि ग्रथात न लिहिलेलें हें ज्ञान मला तुझ्यापासूनच मिळालें आहे—! "

" असूं दे भैय्या ! तुझे शिष्यपण तुलाच लखलाभ होवो ! माझा भाऊ म्हणून तुला मी एक प्रार्थना करत्ये. "

" काय ? "

" मामजी गेले. माझ्याभोंवतींचीं बंधने निखळलीं. आता काशी-पर्यंतची सोबत पाहून दे मला ! "

" काशीला जाणार तुम्ही ? " लवगीनें व्याकुल होऊन विचारले.

" होय पोरी ! ऐकलेस भैय्या, माझ्या जीवनातली एक घटना तुला सांगायची राहिली. मी घरातून गेल्ये, हें पाहून माझ्या वडिलानीं विष खाऊन जीव दिला ! त्याच्या मागोमाग आईहि गेली. पेढीचें वाटोळें झालें. शाही कोतवालाने सगळी संपत्ति आपल्या ताब्यात घेतली. माझें म्हणायला कोणीहि राहिले नाहीं तिथे. आता मला कोणी ओळखणारहि नाहीं काशींत. "

" तुझे काशीला जायचें ठरले आहे ? "

" होय. इथें राहून काय करूं मी ? "

" ठीक आहे. तर मग आम्हालाहि तुझ्याबरोबर काशीस आलें पाहिजे. "

" कशाला ? "

" कशाला ? मांझ्यावाचून तूं राहूं शकशील, कारण तूं मोठी बहीण आहेस. मोठेपणाच्या अहंकारापोटीं तूं मला सोडून जायचें साहस करूं शकशील; पण मला तें करता येणार नाहीं--"

" भैय्या ! "

" होय माई ! मी तें साहस करूं शकणार नाहीं ! तुझ्याबरोबर जाशील तिथे आले पाहिजे मला ! "

" होय बहन ! आम्ही तुम्हाला सोडून राहू शकणार नाहीं !" लवगी आग्रहानें म्हणाली.

" अरे, तुम्ही दोघें वेडीं का आहात ? "

" आतापर्यंत नाहीं; पण तुला जर आम्ही जाऊ देऊं, तर मात्र आम्हाला वेड्याच्या साम्राज्याचा पट्टाभिषेक करून घ्यावा लागेल ! "

" बहन, याचें हे जाणोत ! मी तुम्हाला जाऊ देऊ शकत नाहीं."

" का ग पोरी ? "

" जन्मोजन्मीं न फिटतील, एवढे उपकार करून ठेवले आहेत तुम्हीं माझ्यावर. मी ते फेडायचा प्रयत्नहि करणार नाहीं. मात्र म्हातारपणीं मी तुम्हाला हाताने धरून देवदर्शनाला घेऊन जाईन ! मदिरात गेल्यावर कमी दिसूं लागल्यानें तुम्ही विचाराल, पोरी, माझ्या गोविंदलालाचे पाय कुठें आहेत ग ? मग मी तुमचे हात गोविंदलालाच्या पायावर ठेवीन !

" तुम्हाला न्हाऊं मी घालीन ! तुमचे हे लाब सडक केस मी विंचरीन ! तुम्ही वाती वळायला बसाल तेव्हा कापूस पिंजून देईन !

" अशी नाना प्रकारें तुमची सेवा करीन.

" आणि जेव्हा तुम्ही अतिम वाटचाल करूं लागाल, तेव्हा मी तुमच्या तोंडांत गगाजल घालीन !

" मग तुम्ही डोळ्यात पाणी आणून थरथरत्या हातानीं मला जवळ घ्याल, आणि म्हणाल,

' फार केले हो माझें पोरीने !'

" हें माझ्या जीवनातलें एक मधुर स्वप्न आहे.

" तें पूर्ण करण्यासाठीं मला तुमच्याबरोबर राहिलें पाहिजे !"
गद्गद कंठाने जगन्नाथ म्हणाला,
" माई, सांग ! आता तूं आम्हाला सोडून जाऊ शकशील ?"
आसवें टिपीत माई म्हणाली,
" भैय्या ! तुम्ही दोघेहि सारखेंच दुष्ट आहात !"
दुःखाचा विसर पडण्यासाठीं माईला कुठे तरी नेणें आवश्यक होतें. जगन्नाथ त्याच चिंतेत होता, तो चौथे दिवशीं पातशहानीं विचारले,
" पण्डितजी !"
" जहॉपन्हा !"
" कश्मीरला चलाल ?"
" कश्मीरला ?"
" होय ! मोठा सुहावना मुल्क आहे ! आस्मानशीं टक्कर घेणारें बर्फीले पहाड ! झील ! बडे बडे पेड ! गुलाबाच्या फुलाचे अंथरूण ! बडे बडे चष्मे ! वा: ! क्या खूब ! चला. तिथे मुमताजचे भाई आहेत. असफखॉं. बडा रसिक आदमी. तुम्हाला खूप आवडेल."
" पण—"
" समजलों. एकटे नव्हे. आमची बेटीहि बरोबर येऊ दे."
" आणखी—"
" काय ?"
" माई ! माझी बहीण !"
" ती स्वरदेवता ?"
" होय !"
" वाहवा ! काय मजा येईल ! एखाद्या मोठ्या झीलमध्यें भल्या मोठ्या शिकाऱ्यात आपण सगळे बसू. आस्मानातून चांदनी टपकेल, आणि माई मल्हारचे सुर आलापील ! जरूर घ्या तिला बरोबर !"
जगन्नाथ आणि लवंगी जेव्हा ऐकेचनात, तेव्हा माई काश्मीरला जायला तयार झाली.
आणि मग स्वतः शहाजहॉं, जगन्नाथ, लवंगी, माई ही सगळी मंडळी

शाही लवाजमा बरोबर वागवीत संथपणे प्रवास करीत श्रीनगरला पोंचली. वाटेतला काल जगन्नाथाच्या अपन्हुति, उत्प्रेक्षा, उपमान आदि अलकारा-बरोबर कसा कुठें गेला काहीं कळले नाहीं.

काश्मीरमधील निसर्गाचे कमनीय रूप पाहून जगन्नाथास पराकाष्ठेचा संतोष झाला. अनेकदा सकाळीं सूर्योदयाबरोबर तो एकटाच काश्मिरी शाल पांघरून निसर्गदर्शनास बाहेर पडे. काहीं वेळाने स्वयपाकाची खटपट करीत असलेली माई लवंगीला म्हणे,

" पोरी ! कुठे गेला हा वेडा भैय्या ! जा, त्याला शोधून आण ! "

लवंगी त्याच्या शोधार्थ बाहेर पडे. बराच वेळ शोधल्यावर तो कुठें एखाद्या तलावाचे काठीं धुद होऊन कमलाची शोभा पहात बसलेला तिला दिसे. हळूच मागून जाऊन ती त्याचे नेत्र झाकी. तो ते सोडवायचा प्रयत्न करीत म्हणे,

" सोड ! "

" नाव घ्या ! मग सोडीन ! "

" नाव घेऊ ! काळतोंडी ! "

" जा ! "

" बरें बरे ! हिडिंबा ! "

" हें काय हो ! "

मग तो बळेंबळे तिला आपल्या कुशींत ओढून घेई, आणि तिच्या कानाजवळ तोंड नेऊन म्हणे,

" कमलनयना ! लवंगी ! "

लवंगी डोळे मिटून त्याच्या कुशींत तोंड लपवी. तो तें वर उचली. चालण्याच्या श्रमानीं तिच्या भालावर स्वेदकणिका गोळा होत. त्या आपल्या ओठानीं टिपून जगन्नाथ म्हणे,

" लवंगी, तुझ्यावर काव्य करतो."

" करा बघूं ! "

" ऐक तर !

" हे सुंदरि, मधुर स्मितानें आलोकित असलेलें तुझें मुखकमल पाहून भ्रमराना हें कमलच फुलले आहे, असा भास होऊन आनंद होतो ! "

" पुरे झाले ! नेहमीं आपली ती कमलाची उपमा ! "

" असें ? राहूं दे ती. दुसरी उपमा ऐक.

" तुझ्या हिमगौर मुखकातीला अधिकच शोभा देणारीं तुझीं काळीं बुबुळें पाहून हें जणू मृगलाछनयुक्त चन्द्रबिंब आहे, अशा भ्रमानें चकोराचीं पिलें जिभा चाटू लागतात ! "

आलोक्य सुन्दरि मुखं तव मन्दहासं
नन्दत्यमन्दमरविन्दधिया मिलिन्दाः ॥
किं चासिताक्षि मृगलाञ्छनसभ्रमेण
चञ्चूपुटं चटुलयन्ति चिरं चकोराः ॥

लवंगी स्तिमित होऊन जगन्नाथाच्या मुखाकडे पहात राही, आणि मग एकदम आपल्या अधरानीं ते झाकून घेई.

लवंगीला जाऊन बराच वेळ झाला, हें पाहून माई स्वतः तिच्या शोधास निघे. एकमेकाच्या मिठींत बेहोष होऊन गेलेले हें युगुल तिला दिसलें, कीं ती ठसकल्याचा आव आणी. लगेच हीं दोघें बाजूला होत.

" भैय्या ! अरे एवढा मोठा पण्डित तूं ! "

" काय झाले माई ! "

" तुला एवढें कसे कळेना ! "

" काय ? "

" अरे, अजून रात्र व्हायला पुष्कळ अवधि आहे ! "

" असें का ? हात्तिच्या ! इथे सूर्याचें तेजहि चन्द्रप्रकाशासारखें शीतल भासून दिवसा रात्र असल्याचा भ्रम होतो ! "

" चल ! द्वाड कुठला ! "

कधीं तीं तिघें सायकाळीं फिरायला बाहेर पडत. ताल, तमाल, देवदार, अक्रोड याच्या गर्द राईतून उद्दाम गतीनें वाहणाऱ्या एखाद्या प्रवाहाच्या काठीं असलेल्या खडकावरून धडपडत जेव्हां तीं पाण्याजवळ पोंचत, तेव्हा तें अति शीतल जल हातीं घेऊन जगन्नाथ म्हणे,

" माई, हें जल पाहिलें कीं मला तुझ्या स्नेहाची आठवण होते."

लवंगी विचारी,

" बहनचा स्नेह काय पाण्यासारखा पातळ आहे ? "

" नाहीं ! पाण्यासारखा तृप्तिकारक. पाण्यासारखा मिळेल त्या पात्राचा आकार धारण करणारा."

" म्हणजे काय ? "

" काय तें ऐक. विरागिनी माई तुझ्यामाझ्या प्रणयातील रस नि सग मनाने अनुभवू शकते."

माई हंसून म्हणे,

" करतोस काय भैय्या ! रसग्रहणाची ही मार्मिकता न दाखवली, तर तुम्ही म्हणाल—"

" काय ? "

" ही म्हातारी नको आमच्याबरोबर ! "

" तुला म्हातारी कोण म्हणतो ? "

" कोणीं म्हटलें तरच म्हातारी होईन, असा आशीर्वाद मला मिळालेला नाहीं."

" मग काय आपल्याच मनानें तू म्हातारपण स्वीकारलेस ? "

" होय."

" तर मग मीहि आपल्या मनानेंच या हिमालयाचा स्वामी होऊन तुला या जलप्रवाहाचे पाणी देऊन टाकतो ! "

" वा रे कर्णराजा ! मी या पाण्याचें काय करूं ? "

" रामबागेंतील फुलझाडाना घाल."

फुसफुस हसत लवगी म्हणे,

" नाहीं तर आपल्या म्हशीला पाजा ! "

" म्हैस कुठें आहे ग माझ्याजवळ ? "

" वा वा ! मला जलमंदिरातील तलावाचे पाणी जिच्यासाठीं आणायला सागितलें होतेंत—"

मग तीं तिघेंहि मिळून पोटभर हंसत.

एखादे वेळीं रानभर पसरलेल्या गुलाबाच्या ताटव्यात फिरत असता माई मुद्दाम मागे राही. हातात हात घालून गुलाबपुष्पाचा वास घेत जगन्नाथ मिस्किलपणे लवगीकडे पाहून म्हणे,

" मदन किती द्वाड आहे बघ ! "

" काय केलेन् त्याने ? "

" अपराध तुम्ही करता ! शिक्षा आम्हाला भोगावी लागते ! "

" अपराध ? "

" होय. कुसुमाची शोभा हिरावून घेऊन तुम्ही आपलें अंगप्रत्यंग नटविता ! "

" मग ? "

" मग काय ! या तुमच्या अपराधाबद्दल दंड आम्हाला सोसावा लागतो ! "

" कसला दंड ? "

" तुमच्या यौवनाची नव्हाळी पाहून आमचे प्राण विकल होतात ! "

अङ्गैः सुकुमारतरैः त्व कुसुमाना श्रियं हरसि ।
विकलयति कुसुमबाणो बाणालीभिर्मम प्राणान् ॥

कधीं एखाद्या प्रवालवृक्षाच्या खोडात जगन्नाथ जाऊन बसे. लवंगी उभी राहून म्हणे,

" मला येऊं द्या ना तिथे ! "

" ये कीं ! तुला कोण नको म्हणतो ? "

" असे हो काय करता ? मला झाडावर कुठें चढता येतें ? "

" चढवीन. पण एका अटीवर ! "

" कोणती अट ? "

" वर आल्यावर एक--"

" जा ! "

" बरे बरें ! रुसूं नकोस. ये. "

जगन्नाथानें हात देऊन लवंगीस आपल्याजवळ घ्यावें. तेवढ्या श्रमानींहि आरक्त झालेल्या तिच्या मुखाचे बळेंबळें चुंबन घेऊन जगन्नाथानें म्हणावें,

" लवंगी, तुझ्या अधराच्या मधुरिमेनें या प्रवालवृक्षाच्या लालीस लाज आणली,

" आणि याचे कोमल पल्लव—

" तुझ्या अधराच्या मृदुतेमुळें लाजून त्यानीं माना खालीं घातल्या !"

अरुणमपि विद्रुमद्रुं मृदुलतरं चापि किसलयं बाले
अधरीकरोति नितरा तवाधरो मधुरिमातिशयात् ॥

सायंकाळ झाल्यावर त्या दोघानीं झाडावरून उतरून हातात हात घालून घरीं परतावें. असा काळ मोठा सुखात चालला.

जणूं ते दिवस मोठी श्रवणरम्य कथाच होती. हूं म्हणताक्षणीं एक सायकाळ उलटून जावी, पण तिचे लवमात्र भान असू नये.

एके सकाळीं जगन्नाथ फिरायला जाण्याच्या तयारींत आहे, तो पातशहाकडून बोलावणे आलें. एका चौखाबी किनखाबी तंबूत शहाजहाँ उतरले होते. पहारेकऱ्याच्या मधून जगन्नाथाने तबूंत प्रवेश केला, तेव्हा हुक्क्याची नळी बाजूला ठेवून पातशहा म्हणाले,

" या पण्डितजी !"

पातशहाची विषण्ण मुद्रा पाहून चिंतित स्वरात जगन्नाथाने विचारलें,

" हुजुराची प्रकृति ठीक दिसत नाहीं—"

" तबियत ठीक आहे आमची."

" मग मुद्रा उदास का ?"

क्षणभर थाबून शहाजहाँ म्हणाले,

" पण्डितजी ! तुम्हापासून चोरून ठेवण्याजोगें काहीं नाहीं. तुम्हाला माहीत आहे, आमच्या दारावर आमची अधिक मुहब्बत आहे."

" शहेजादा दाराचा स्वभावच कुणालाहि आवडण्यासारखा आहे !"

" होय. तुमचेंहि त्याच्यावर प्रेम आहे."

" ते माझे स्नेही आहेत."

" तर नेमकी हीच गोष्ट आमच्या औरंगजेबाला आवडत नाहीं."

" कां ?"

" दाराची परधर्मसहिष्णुता त्याच्या मनास येत नाहीं ! त्यानें आमच्या मुरादच्या हातात हात मिळवून तिकडे पुंडावा माडला आहे ! शिवाय दक्षिणेंतहि विजापुरकराचें बड वाढीस लागलें आहे. तें बड मोडायला काय आम्ही स्वत: जावें—"

" शहेनशाह,

" मत्त मातगाच्या गण्डस्थलावर आपल्या नखानीं चित्रें काढणें, ही ज्याची आवडती क्रीडा, त्या केसरीने काय हरिणाच्या धुमाळीकडे नजर वर उचलून अवधान द्यावें ? "

वेतण्डगण्डकण्डूतिपाण्डित्यपरिपन्थिना
हरिणा हरिणालीपु कथ्यतां कः पराक्रमः ॥

" तुमचे म्हणणेहि ठीक आहे पण्डितजी ! लेकिन आज दिल अस्वस्थ झालें आहे. दाल झीलमध्यें चलता ? "

" सगळी मडळी ? "

" होय. तुमची माई येईल ? "

" होय. येईल ती. एकदा आपल्याला गाणें ऐकविण्याचें तिच्याहि मनात आहे."

" चला तर. "

दुसरे दिवशीं ही सगळी मडळी दाल सरोवराचे रोखाने निघाली. सरोवरावर चारसहा भव्य शिकारे तयार होते. त्यातला एक बहुमोल गालिचानीं सजवला असून वर किनखाबी छप्पर होतें. स्वतः शहाजहॉं, जगन्नाथ, माई, लवंगी आणि असफखॉं ही मंडळी त्या शिकाऱ्यात चढली, आणि इतर मंडळी दुसऱ्या शिकाऱ्यावर स्वार झाली.

शिकारे सुरू झाले, त्या वेळीं सूर्य पश्चिमेकडे कलला होता. भोंवतालच्या बर्फाच्छादित गिरिशिखराचीं रक्तवर्ण प्रतिबिंबें तलावाच्या स्वच्छ, निळसर पाण्यात चकाकत होतीं. वाऱ्याच्या झुळकींनीं वातावरणात अधिकच रम्यता आणली होती.

लवंगी शहाजहॉंच्या जवळ बसली. तिच्या पाठीवरून हात फिरवीत शहाजहॉं म्हणाले,

" बेटी ! खुश तो हो ? "

" जी हाँ अब्बाजान ! "

" असफखाँ, या इकडे ! तुमची आमच्या रसिक पण्डितराजाशीं ओळख करून देतों. "

जगन्नाथाला जवळ बसवीत शहाजहाँ म्हणाले,

" हे आमचे जावई राजपण्डित जगन्नाथ ! शायरी याच्या घरीं पाणी भरत्ये ! शायरीहि अशीतशी नव्हे ! बेहद ऊंची ! अव्वल दर्जाची ! "

" आपल्या प्रिय माणसाची प्रशंसा करावी, हा सज्जनाचा स्वभावच आहे खाँसाहेब ! "

" हा आपला विनय आहे पण्डितजी ! " असफखाँ म्हणाला, " इतके दिवस शहेनशहाँच्या सरबराईत गुंतलो असल्याने आपली पहेचान होण्याचा मौका आला नाहीं. "

" हा हा ! असफखाँ, पहेचान न होऊ शकली, तर कांहींतरी कमी रहावी, असेच पण्डितजींचें पाण्डित्य आहे ! पाण्डितजी, सुनवा ना कांहीं !"

" ऐकावें हुजूर ! " जगन्नाथ क्षणभर चिंतन करून अंगुलि उचलीत म्हणाला,

" दक्षिणवायु वहात आहे.

" देवदाराच्या फुलोऱ्यातून डोकावणाऱ्या आम्रवृक्षांचीं तांबूस पानें शोभायमान भासत आहेत.

" कोकिला कूजन करीत आहेत.

" हें वातावरण आम्हाला सुखमय भासत असले, तरी—

" त्या तिथें, पलिकडील तीरावर—

" एका झोपडींत,

" कमलाची काति जिच्या अंगकातीपुढे उणी भासावी, अशा बालेला—

" आपले प्राण साभाळणेंहि कठीण झालें आहे.

" तिला दक्षिणवायु—

" चन्दनवृक्षावर वास्तव्य करणाऱ्या नागराजाच्या फूत्काराप्रमाणें वाटत आहे.

" आम्रवृक्षाच्या पल्लवाची रक्तिमा तिला खैराच्या इंगळासारखी नेत्र-दाहक झाली आहे.

" कोकिलाचें कूजन तिला विषवत् झाले आहे!

पाटीरद्रुभुजङ्गपुङ्गवमुखायाता इवातापिनो
वाता वान्ति दहन्ति लोचनममी ताम्रा रसालद्रुमा: ॥
एते हन्त किरन्ति कूजितमयं हालाहल कोकिला
बाला बालमृणालकोमलतनुः प्राणान्कथं रक्षतु ॥

" कारण ज्यामुळे हे सगळे सुखमय भासते,

" असा तिचा प्रियकर तिच्याजवळ नाहीं!"

शहाजहाॅं रागावून म्हणाले,

" कुठे आहे तो कातिल!"

" तो या आपल्या शिकाऱ्यावर वल्हीं चालवीत आहे!"

असफखाॅं अत्यत सन्तुष्ट होऊन उठला, आणि त्याने आपल्या डोक्या-वरील पगडी उतरून जगन्नाथाच्या डोक्यावर ठेवीत म्हटले,

" लाजबाब! पण्डितराज! आपण आजपासून माझे भाई झालात!"

शहाजहाँ म्हणाले,

" पण्डितराज! असफखाॅं आमच्या बेगम मुमताजमहलचे भाई आहेत! ताजमहाल बाधताना याचें खूप साहाय्य झाले आहे आम्हाला!"

भाबावल्याचा आव आणून जगन्नाथ म्हणाला,

" हरे राम! कसा कठिण प्रसग ओढवला!"

" का हो, काय झाले!"

" आता मी कोण?"

सगळी मंडळी जगन्नाथाच्या तोंडाकडे बघू लागली. शहाजहाॅं म्हणाले,

" पण्डितराज, काव्य करीत आहात काय?"

" छे छे! मीच कवितेचा विषय झालों आहे!"

" कसे?"

" असफखाॅं आपले मेहुणे, या नात्यानें मी आपला मेहुणा झालों— आणि--आणि लवगीचा पति या नात्यानें--"

हंशानें नावेतले वातावरण जणूं सजीव झालें. शहाजहाँ म्हणाले,

"असफखॉ, गाणें ऐकायचें आहे !"

"वा वा ! अशा वेळीं गाणें ऐकायला मिळालें, तर बेहस्त खालीं उतरेल ! कोण गातें ?"

"माझी बहीण गात्ये."

असफखॉ म्हणाला,

"जहॅापन्हा, मीं एक बेहतरीन सारंगिया आणि तबलजी घेतला आहे बरोबर. पण्डितराज, त्याची साथ चालेल काय आपल्या बहिणीला ?"

जगन्नाथानें माईकडे पाहिलेंन्. तिने काहीं न बोलतां मान डोलावली. लगेच असफखॉनें शेजारील शिकाऱ्यास जवळ बोलावून त्यावरील म्हाताऱ्या सारंगीवाल्याला आणि तबलजीला वाद्यासह शाही शिकाऱ्यावर घेतलें. त्या दोघानीं पातशहॉना लवून मुजरे केले, आणि वाद्यें लावलीं. समोरील गालिच्यावर माई मर्यादेनें येऊन बसली.

तिचा अगदीं साधा वेष पाहून सारंगिया खवचटपणें हळूच म्हणाला,

"ये गाएंगीं ?"

माईच्या तें लक्षात आलें. तरी काहीं न बोलता तिने मनोमनीं गोविंद-लालाचे ध्यान करून नमस्कार केला.

तबलियानें तबल्यावर थाप टाकली. सारंगियाने पहिल्या तडाख्यास एक अद्‌भुत स्वरवेल उभवून षड्‌जावर गज स्थिर केला.

माईनें मान डोलावून अगदीं अलगत त्या स्वरात आपला स्वर मिळवून दिला. तोहि अशा अजोडपणें कीं कळे न कळे. पातशहानीं मान हालवून वा ! म्हटले. असफखॉं जरा पुढे सरला.

सूर्य अस्तास जात होता. तलावाच्या पाण्यात पडलेलीं हिमशिखराचीं प्रतिबिंबें अंधुक होत होतीं. शिकाऱ्यात अत्तराचे दिवे पेटले होते. सगळें वातावरण धड ना ज्ञात, धड ना अज्ञात, अशा उदासीनपणाने भरून गेले होते. वल्ह्याचा होणारा सपसप आवाज हें औदासीन्य वाढवीत होता.

आणि माईनें विरही मारव्याचे स्वर आलापिले.

पहिल्या स्वरविस्तारांतच तिनें श्रोत्याना जिंकलें. सारंगिया जरा सावधपणें वाजवूं लागला.

तिनें अत्यंत मंद लयींत एकतालातील पद सुरू केलें.

आयी रजनिया ॥

" रात्र झाली आहे.

" कोकिलपक्षी गाऊन गाऊन थकून स्वस्थ बसला आहे.

" आकाशात चतुर्थीचा क्षीण चन्द्र कसाबसा प्रकाशत आहे.

" रातकिडे किर्र किर्र करीत आहेत.

" प्रियतम दूर देशास निघून गेला आहे.

" त्याची आठवण काढून काढून प्रिया क्षीण झाली आहे.

" ती मृत्यूला म्हणत आहे--

" मृत्यो ! माझें शरीर खुशाल नष्ट कर !

" पण नेत्राची शक्ति नेऊ नकोस !

" कारण---

" माझा प्रियतम आल्यावर एकदा त्याला डोळे भरून पहावें,

" असें माझ्या मनात फार आहे ! "

प्रत्येक शब्द माई अत्यंत स्वच्छपणे म्हणत होती. प्रत्येक चरण सर्वांच्या अन्त:करणास स्पर्श करीत होता. मनें अत्यंत मृदु होऊन माईच्या स्वराशीं तल्लीन झालीं. भावनाचे बंद खुलले. अतरींचीं दारें सताड उघडलीं. अतरा संपवून माई ध्रुपदावर उतरली,

आयी रजनिया ॥

मूर्तिमत विरहिणी तिनें सगळ्याच्या दृष्टीसमोर उभी केली, आणि ती थाबली.

शहाजहॉच्या डोळ्यातून आसवें वाहूं लागलीं. अस्फुट स्वरांत ते म्हणाले,

" मुमताज ! प्यारी मुमताज ! "

लवगीनें पातशहॉच्या कुशींत डोकें खुपशीत म्हटलें,

" अब्बाजान ! "

तिच्या डोक्यावर हात फिरवीत पातशहा बोलले,

" मेरी लाडली बिटिया ! "

जगन्नाथाची समाधि लागली. असफखॉं भावावेगामुळे कांहीं न बोलतां स्तब्ध बसून राहिला. सारंगियानें सारंगी खालीं ठेवून माईपुढें डोके टेकले.

भरलेल्या स्वरात शहाजहॉं म्हणाले,

" माई ! आम्ही काय कौतुक करणार तुमच्या कलेचे ! तुम्हाला कांहींहि वस्तु देणें ही अल्लाह्च्या घरची गुनहगारी ठरेल ! तुमची कला मोल करण्यापलीकडील आहे ! आज तुम्हीं विरहिणीच्या रूपानें मुमताजला आमच्यासमोर खडें केलेत—ताजमहालातील कबरींत चिरविश्रान्ति घेत असलेल्या मुमताजला ! "

जगन्नाथ भानावर आला, आणि त्यानें सर्वांच्या देखत माईच्या पायास हात लावून वंदन केलें.

" हा ! " पातशहा एकदम म्हणाले, " हे माईच्या गानविद्येचें खरें मोल ! "

बैठक उदासपणें सपली. शिकाऱ्यातील एक खोली या तिघाना दिली होती. त्या खोलींत जाऊन जगन्नाथ अंथरुणावर कांहीं न बोलता पहुडला.

" का हो ? जेवायचे नाहीं ? " लवंगीनें विचारले.

" नाहीं. "

" का रे भैय्या ? "

" माई ! तू आपल्या स्वरसामर्थ्यानें एका वेगळ्या जगात नेऊन सोडलें आहेस—

" उदास, पण मधुर !

" मला कृपा करून त्यातून खालीं ओढूं नकोस ! तिथेंच राहूं दे ! विरहगीते गाव ! "



# .११.

माईनें आपल्या विरहगीताने निर्माण केलेले औदासीन्य—

एवढ्या वेगानें तें जीवनाच्या प्रत्येक अगास स्पर्श करून दशांगुलें उरेल अशी कल्पना कोणींच केली नव्हती, खुद्द माईनेहि नाहीं.

काश्मीरहून मंडळी दिल्लीस परतली, आणि लगेच पातशहा मुमताजच्या कबरीच्या दर्शनासाठीं म्हणून आग्र्याला गेले.

जगन्नाथाच्या या विवाहाबद्दल पसरलेला असतोष एव्हापर्यंत वाढीस लागला होता. ज्या राणा जौहरसिंगजींनीं एकदा जगन्नाथाचे अपूर्व कौतुक केलें, त्याच्याच घरीं जगन्नाथाचा निषेध करून त्यावर बहिष्कार टाकावा कीं काय याचा निर्णय घेण्यासाठीं पण्डिताची सभा भरली. स्वत: जगन्नाथालाहि त्या सभेत बोलावणे केले गेले. वादाची रणधुमाळी उडाली. कोणी काहीं ऐकून घ्यायलाच तयार होईना. जगन्नाथाने "स्त्रीरत्न दुष्कुलादपि" हें मनूचें वचन पुढे करून आपले समर्थन करायचा कसोशीनें प्रयत्न केला; पण दिल्लीकर पण्डिताचा मनूच्या वचनापेक्षा आपल्या बाहुसामर्थ्यावरच अधिक भरवसा होता.

शेवटीं राणा जौहरसिंगजींनीं तो कोलाहल थाबविला, आणि ते जगन्नाथास म्हणाले,

" पण्डितजी, मला आपल्यासमोर धृष्टतेने प्रस्ताव माडताना फार वाईट वाटतें—"

" राणाजी, सभेने शिष्टाचाराची मर्यादा केव्हाच ओलाडली आहे ! "

" नाहीं पण--"

" कशाला अडखळता राणाजी ? स्पष्टपणें सागून का टाकीत नाही ! "

" ठीक आहे. आपण यवनीचा त्याग करून--"

" बोला ! "

" प्रायश्चित्त घ्यायला सिद्ध असाल—"

" प्रायश्चित्त ? "

" होय ! पण्डिताचा तसा आग्रह आहे ! "

" या पण्डिताचा ? "

" होय रे यवनीच्या जारा ! " एक उद्दाम ब्राह्मण गर्जला.

" थाबा ! का उगीच वाद वाढविता ? " राणाजी दोन्ही हात उभवून म्हणाले.

जगन्नाथानें आपला ओठ चावला, आणि काहीं न बोलता तो स्तब्ध राहिला.

" करा पण्डितजी ! एवढेच हे करा ! आपले पाडित्य आम्हाला वंदनीय, आहे—"

" पुरे !" जगन्नाथ गदगदा हलून स्वतःला शक्य तितका आवर घालीत बोलला,

" अधिक बोलून आपला आणि आमचा मनस्ताप वाढवावा अशी आमचीहि इच्छा नाहीं."

" मग काय आहे आपली इच्छा ? "

" आपण यवनीचा त्याग करावा ! आपल्याला केवळ स्त्रीसुखच हवे असेल, तर--"

" मीं हे न केले तर ? "

" तर !–तर आम्हाला दुर्दैवाने आपणाला जातिबहिष्कृत करावें लागेल!"

" हें भय आपण कुणाला घालीत आहात, कल्पना आहे ना ? "

" होय ! दुर्दैवाने पातशहानीं आपणास जामात करून घेतलें आहे."

" ही गोष्ट जर त्याच्या कानापर्यंत गेली तर ? "

" तर ?—तर बहिष्कार मागें घ्यावा लागेल, हें आम्हाला माहीत आहे! पण मनोमनीं—–"

" ऐका! मी उद्या माझे घरीं सर्वांस जेवायचें निमंत्रण करण्यासाठीं शाही स्वार धाडला, तर जो तें निमंत्रण नाकारील असा कोणी पण्डितश्रुव इथें आहे काय ? "

सभेत थोडी चुळबुळ झाली, पण पुनः सगळें शांत झालें.

" पण्डितमन्यानो! ऐका!

" तुम्ही सगळे अत्यंत क्षुद्र आहात

" मदोन्मत्त गजांसंबधीं सिंहाने केवळ ऐकलेच काय ते होतें.

" ज्याच्यावर आपल्या तीव्र नवनिशित नखानीं चित्रे काढावींत, असा कोणी या सभेंत दिसत नाहीं!

" इथे केवळ वाचाळ जंबुक आहेत!

" मृग आहेत.

" लाडगेहि आहेत.

" तेव्हा केसरी आपल्या नखाचें पांडित्य प्रकट करणार नाहीं!

दिगन्ते श्रूयन्ते मदमलिनगण्डाः करटिनः
करिण्यः कारुण्यास्पदमसमशीलाः खलु मृगाः ।
इदानीं लोकेऽस्मिन्ननुपमशिखाना पुनरयं
नखाना पाण्डित्य प्रकटयतु कस्मिन्मृगपतिः ॥

" तुमचा विरोध विचारातहि न घेण्याच्या लायकीचा आहे.

" तरी पण ऐका.

" मीं लवंगीचे धर्मविधीने पाणिग्रहण केले आहे.

" तिची माझी ताटातूट एक मृत्यूच करू शकेल.

" तुमच्या या धृष्टतेचे प्रायश्चित्त तुम्हाकडून घडाविणेंहि काहीं अशक्य नाहीं.

" पण तो विचार मी सोडून देतों.

" कारण तेवढीहि तुमची योग्यता नाहीं. "

जगन्नाथ सभेंतून उठला आणि तसाच घराकडे निघाला. त्याला

मार्गात लोक जागोजाग जमून भीतिग्रस्त मुद्रांनीं चर्चा करताना दिसले. हें असे का व्हावे, तें त्याला कळेना. अस्वस्थ मनानें त्यानें घरीं पाऊल घातलेन्, तो त्याला माई शोकाकुल लवगीची समजूत घालीत असलेली दिसली.

" काय झाले ? " आश्चर्यमग्न जगन्नाथानें विचारले.

" भैय्या ? बरें झाले तूं आलास ! "

" का ? "

" एवढा वेळ मी तुझीच वाट पहात होत्यें. "

" कशासाठीं ? "

" हिची समजूत घालण्यासाठीं ! "

माई उठून बाहेर गेली. जगन्नाथ लवंगीजवळ गेला आणि खालीं बसून तिला कुशींत ओढीत तो म्हणाला,

" का रडत्येस ? "

" तुम्हाला नाहीं कळले ? "

" काय ? "

" अब्बाजान आग्र्याला गेले—"

" मग ? "

" तिकडे त्याना पक्षघाताचा झटका आला ! "

" अरे ! "

" अर्धे अंग लुळे पडलें ! "

" बरोबर कोण आहे ? "

" सलीमा ! पण--"

" पण काय ? "

" तिलाहि तो राहूं देणार नाहीं त्याच्याजवळ ! "

" कोण ? "

" औरंगजेब ! "

" कां ? "

" मुरादला बरोबर घेऊन त्यानें आग्रा काबीज केलें, अब्बाजानना कैद केलें, आणि दारावर चाल करून गेला आहे तो ! "

" दारावर ? करीना का चाल ! शाही फौज दारामागें उभी आहे !"

" तुम्हाला इथली राजनीति माहीत नाहीं. "

" काय आहे ती ?"

" दारानें राज्यावर बसणें लोकाना आवडणार नाहीं. "

" कां ? "

" तो युद्ध करण्याच्या विरुद्ध आहे; आणि इथल्या लोकांना लुटालूट करणेंच आवडते. "

" मग काय होईल ! "

लवंगीनें काहीं क्षण तसेच दवडले, आणि मग डोळे पुशीत म्हणाली,

" औरंगजेब दाराला ठार मारणार ! "

" हरि हरि ! काय सागत्येस हें ? "

" जे घडते तेच सागत्ये. भावाचे मुडदे पाडून ताज मिळविणें हा शाही रिवाज आहे इथला ! "

एक निश्वास सोडून जगन्नाथ म्हणाला,

" धन्य आहे राजनीति ! "

काहीं वेळ दोघेहि बोललीं नाहींत. मग त्याच्या कुशींतून डोके वर उचलीत लवगी म्हणाली,

" मी औरंगजेबाला ओळखत्ये. आता या जन्मीं अब्बाजानची भेट घडणार नाहीं ! आणि—"

" आणि काय ? "

" आम्हाला दिल्ली सोडून गेलें पाहिजे ! "

" का ? "

" आमचा विवाह ज्याना रुचला नाहीं अशा लोकाचा शिरोमणि आहे औरंगजेब ! "

एक निश्वास टाकून जगन्नाथ म्हणाला,

" का ? "

" कारण मी मुसलमान आणि तुम्ही हिन्दु ! "

" नेमकें हेंच—"

" काय ? "

जगन्नाथ उठून उभा राहिला, आणि त्यानें माईला हाक मारली. आत येऊन माई म्हणाली,

" काय भैय्या ! "

" दोघीहि ऐका ! "

त्याने संभेतील वृत्त त्या दोघींना ऐकविलें. दोघीहि श्वास रोधून ऐकत राहिल्या. लवगीची मुद्रा काळवडून गेली. जगन्नाथ निर्धारयुक्त स्वरात म्हणाला,

" लवगी, खिन्न का होत्येस ? "

तिच्या डोळ्यातून आसवे ओघळूं लागलीं. तीं टिपून ती म्हणाली,

" माझ्यामुळे—"

" वेडी आहेस तूं लवगी ! आपल्या आयुष्यातील अत्यत मधुर काल आपण एकत्र घालविला आहे. आपण दोघें एकमेकाच्या जीवनात इतकीं मिळून गेलो आहोत, कीं आपल्याला वेगळें करण्याचे सामर्थ्य कृतान्त काळाचेहि अंगीं नाहीं !

" तो हीं शरीरें वेगळीं करूं शकेल !

" पण मने ?

" तीं एकरस होऊन गेलीं आहेत--

" गंगा–यमुनासारखीं.

" त्याचा संगम तेवढाच विशुद्ध ! तेवढाच पवित्र !

" ऐक लवंगी.

" तूं, मी आणि माई—

" गंगा, यमुना आणि सरस्वती !

" हे प्रयाग भावी प्रेमी युगुलाचे तीर्थस्थान होईल !

" जगाकडून निंदिलीं, उपेक्षिलीं गेलेलीं युगुले--

" त्याना या प्रयागात स्नान करून चिरशातीचा लाभ होईल !

" त्यांच्या अस्थि या त्रिवेणी संगमांत विसांवतील ! "

माई जगन्नाथाजवळ आली, आणि अत्यंत स्नेहभावानें त्याच्या पाठी-वर हात ठेवीत म्हणाली,

" भैय्या ! मी तुझ्यासारखा भाऊ मिळवून धन्य झाल्यें ! आणि या पोरीसारखी वहिनी मिळवून !

" अरे ! चला माझ्याबरोबर. मी गाणीं गाऊन पुनः एकदा भिक्षा मागेन. आपण तिघे मिळून तीर्थयात्रेला जाऊं. वाटेंत कोणी आपली जात विचारणार नाहीं ! आणि—आणि विरागिनींकडे पाहताना आपली दृष्टि स्वच्छ ठेवण्याएवढी धर्मबुद्धि या देशात अजून जागृत आहे ! "

" होय माई ! आपण सगळ्या तीर्थयात्रा संपवूं ! मथुरेला जाऊन गोविंदलालाच्या मदिरात पुनः एकदां तूं गा. आम्ही आमची नम्र श्रद्धा त्याच्या चरणीं समर्पित करू.

" मग आपण हिमालयात जाऊ !

" तिथे एका हिमवाहिनीच्या तटाकीं आपण एक झोंपडी बाधूं.

" तूं पाणी आणीत जा, ही स्वयपाक करीत जाईल.

" आणि मी तिथें एक पाठशाळा सुरू करीन !

" त्या पाठशाळेंत मी विद्यार्थ्यांना अलंकारशास्त्रात प्रवीण करीन !

" नानावृत्तें--

" शिखरिणी, पृथ्वी, शार्दूलविक्रीडित, मालिनी, पुष्पिताग्रा, प्रहर्षिणी, वसन्ततिलका, गीति, आर्या, उद्गीति, मन्दाक्रान्ता—

" हीं सगळीं वृत्तें मी पुनः एकदा जीवन्त करीन !

" आणीकहि नवीं वृत्तें घडवीन मी !

" आणि पातशहानीं दिलेली उपाधि—

" राजपण्डित—

" तिचे अक्षर आणि अक्षर मी सार्थ करीन !

" माझ्यानतर होणाऱ्या सर्व पण्डितांनीं अगोदर मला अनन्यभावानें नमस्कार करून मग पद्यरचनेस प्रारभ करावा, असें लाघव मी रचीन !

" हें सर्व करण्यास आवश्यक ती शातता मला तिथें लाभेल !

" चल माई ! "

माई कौतुकानें म्हणाली,

" भैय्या, मला करावें लागणारें एक काम विसरलास तूं ! "

" काय ? "

" या माझ्या द्वाड सुनेच्या पोराला खेळविणे— "

शोकभारानें विव्हल झालेली लवंगीहि या परिहासानें खुदकन् हसली.

पण सर्वच घटना अकल्पनीय गतीनें घडत होत्या. त्याच रात्रीं दिल्लीभर लोकाची धावाधांव सुरू झाली. शहाजहॉं आणि दारा या दोघाच्या हितैषी सरदाराच्या घरावर चौक्यापहारे बसले.

सायंकाळी लवंगीची म्हातारी दासी घाबऱ्या घाबऱ्या येऊन लवगीला म्हणाली,

" बिटिया, अम्माजान मेहरुन्निसाचा निरोप आहे ! "

" काय ? "

" आजच्या आज इथून निघून जा ! "

" का ? "

" उद्या सकाळपर्यंत खासा औरगजेब येऊन दिल्लीची नाकेबदी करील! "

लवगी चिंतातुर मुद्रेनें माईकडे गेली, आणि तिला ही वार्ता सागून म्हणाली,

" आता ? "

" भैय्या कुठे आहे ? "

" ते दाराची चौकशी करायला गेले आहेत."

" तो आल्यावर लगेच निघायचे."

" लगेच ? "

" होय पोरी ! या पेटत्या आगींतून शक्य तितक्या लवकर बाहेर पडलें पाहिजे. "

लवंगी डोक्यावर हात देऊन बसून राहिली. माई भराभर सामानाची आवराआवर करू लागली खरी; पण काय घ्यावे आणि काय ठेवावें हेहि तिला कळेनासें झालें.

एवढ्यात जगन्नाथ घरीं परतला. ही आवरासावर पाहून तो चकित होऊन म्हणाला,

" काय हें माई ? "

" हें सगळे देऊन टाकणार आहें."

" कुणाला ? "

" औरंगजेबाला बक्षीस म्हणून ! " माई हंसली. जगन्नाथ वेड्या-सारखा तिच्याकडे पहात राहिला. तोंच लवंगी उठून त्याच्याजवळ आली, आणि त्याचा हात धरून केविलवाण्या स्वरात म्हणाली,

" अहो ! आपल्याला आताच निघालें पाहिजे ? "

" कुठें ? "

" कुठे ? मला नाहीं माहीत ! "

" मला तरी कुठे माहीत आहे ? "

माई हातची वस्तु खालीं ठेवीत म्हणाली,

" मग काय मला माहीत आहे ? "

" बरें झालें. कुणालाच माहीत नाहीं ! " जगन्नाथ खालीं बसला.

माई त्याच्याजवळ गेली, आणि म्हणाली,

" भैय्या! वेड्यासारखे काय करतोस ? ऊठ, आत्ता निघायला हवें इथून!"

" कुठे ? "

" कुठेहि ! वाट मिळेल तिकडे."

" पण दाराची खबर अजून मिळाली नाहीं."

" ती सावकाश मिळेल ! तूं अगोदर अंगावर वागविता येईल इतकें सामान घे."

" का ? "

माईने औरंगजेबाच्या आगमनाविषयीं कळलेला निरोप त्याला सांगितला. लवंगी स्फुदत म्हणाली,

" बहन, आपण गेलों, तर माझे ससे, हरीण, मीं काश्मीरांतून आणलेले देवदाराचें रोप—"

" सश्याच्या आणि हरिणांच्या गळ्यांत दोऱ्या बांधून बरोबर घे ! "

" वा: ! मग तें सर्व इथें सोडून द्यावें लागेल, असें का सागत नाहीं ?"

" माझ्या गोजिरवाण्या सुने ! अगोदर घराबाहेर पडा ! या सगळ्या गोष्टींची चिंता आपण बाहेर गेल्यावर निवान्तपणे करूं ! "

त्या रात्रीं, तशा गोंधळात घोडीं मिळविणें हेंहि अशक्य होतें. शेवटीं मध्यरात्रीं एकदाचे माईने त्या दोघाना घराबाहेर काढलेंन्. दिल्ली-विषयक अनेक प्रिय आठवणी जाग्या होऊन लवंगी मुकाट्यानें आसवें ढाळीत चालूं लागली.

पहाऱ्याची व्यवस्था पार कोलमडून पडली होती. अनेक कुटुम्बें घोडीं, मेणे, उंट, गाड्या, काय मिळेल तें वाहन वापरून दिल्लीबाहेर पडत होतीं. वाटेत काहीं ठिकाणीं दाडगे अरब, पठाण आदि पंचहत्यारी स्वार या पळणाऱ्या तांड्यापैकीं इच्छेस येईल त्याला अडवून लुटालूट करीत होते. सुदैवाने यापैकीं कुणाचीहि दृष्टि न जाता हीं माणसें मथुरेच्या वाटेनें दिल्ली-बाहेर पडलीं.

अंधारात ठेचा खात पुढील प्रवाशाच्या अनुरोधाने, अंगावरील ओझें वागवीत चालणे माईला संवईचे झाले होतें. जगन्नाथहि या क्षेत्रात फारसा नवीन नव्हता. तें क्षेत्र सर्वथा अपरिचित होतें लवंगीला. आजपर्यंत शाही महालाबाहेर फारसें कधीं पाऊल न टाकलेल्या तिला मात्र तो प्रवास अगदीं असह्य झाला.

दोनतीन मैल कशीबशी त्या दोघाबरोबर चालून मग लवंगी मध्येंच थाबली आणि म्हणाली,

" अजून किती लाब जायचे आहे ? "

" पुष्कळ लाब. नुक्ता तर कुठे या प्रवासाला प्रारंभ झाला आहे."

विमनस्क जगन्नाथानें उत्तर दिलें, आणि तो तसाच चालत राहिला. पण लवगी थांबली, हें माईला कळलें. ती तिच्याजवळ गेली, आणि म्हणाली,

" का ग पोरी ? थकलीस ? "

त्या प्रश्नातला ओलावा लवगीला जाणवला. ती गहिंवरून म्हणाली,

" बहन ! मला संवय नाहीं ना चालायची ! "

" होय. मला माहीत आहे तें. आण तुझें सामान माझ्याजवळ. "

" नको बहन."

" देत्येस की नाहीं ?

" पण तुमच्याजवळ अगोदरच माझ्यापेक्षा अधिक ओझे आहे ! "

" आता मी रागावेन बरे का ! "

माईनें बळें बळे तिच्याजवळचें सामान घेतले, आणि मग त्या जगन्नाथाचा मागोवा घेत चालू लागल्या.

आणखी एक आपत्ति उभी राहिली ! विचारमग्न जगन्नाथ या दोघींच्या थांबण्याकडे लक्ष न राहून तसाच पुढे गेला ! हू हू असे हुकार टाकीत भोई एक मेणा घेऊन त्या दोघींच्या पुढे गेले आणि त्याच्यामागून एक घोडेस्वार ! लवगी बावरून म्हणाली,

" हे कुठे आहेत ? "

माईहि थोडीशी घाबरली. ती हाका मारू लागली,

" भैय्या ! अरे भैय्या ! "

उत्तर नाहीं ! लवंगी तिला चिकटून रडूं लागली. तिला समजावीत माई म्हणाली,

" उगी पोरी ! रडून का भागते ? आल्या प्रसंगाला तोंड द्यायला हवें. देव कदाचित् आपली परीक्षाच पहात असेल. भैय्या पुढें गेला आहे. आपण मागें राहिलों, हे त्याच्या लक्षात आलेलें दिसत नाहीं. तो थांबला असेल आपल्यासाठीं. चल. थांबून भागायचें नाहीं. "

माई जवळ जवळ लवंगीला ओढीतच निघाली, तों मागून घोडेस्वारांची एक टोळी उधळत आली. माईनें लवगीला बाजूस ओढले, म्हणून बरें झालें. एरव्हीं ती टापाखालींच सापडती.

आता मात्र लवगीच्या अंगांतलें चैतन्य जवळजवळ हारपलें !

पति कुठें दिसेनासा झाला आहे, मार्गहि अनोळखी, त्यात अंधाराची भर, भोंवतालीं जीव घेऊन बेभानपणें पळत सुटलेली गर्दी, अशा स्थितींत ती कोमलांगी वाघाच्या तोंडीं सांपडलेल्या हरिणीसारखी थरथर कांपू लागली.

माई वळून तिला म्हणाली,

" पोरी ! खांद्यावर बसत्येस का माझ्या ? "

" बहन ! बहन !" असें पुटपुटून लवंगीने माईच्या गळ्यात मिठी मारली. तिची समजूत कशी काढावी, ते माईला कळेनासे झाले. तिचाहि धीर खचू लागला.

तोंच हाक ऐकू आली,

" माई ! "

" भैय्या ! "

घाबरलेला जगन्नाथ आवाजाच्या अनुरोधाने याच्याजवळ आला. त्याला पाहताच लवगी त्याच्या गळ्यात पडून स्फुंदू लागली.

" कुठे गेला होतास भैय्या ? "

" तुम्ही मागे राहिलात हें माझ्या ध्यानीं आले, तेव्हा जवळजवळ अर्धा मैल पुढे गेलों होतो ! अचानक मागें वळून पाहिलें ! तुम्ही नाहीं ! एकदम धस्स झाले ! वाटले, संपले ! तसाच मागे वळून पळत सुटलो ! "

" छान केलेस ! इथें एका माणसाने अगदीं पाय पसरून रडायला बसायची वेळ आणली होती ! "

" लवगी ! घाबरली होतीस ? "

" नाहीं ! पेढे वाटण्याच्या तयारींत होती. " माई म्हणाली.

" चला आता. "

जगन्नाथानें लवंगीचा हात धरला, आणि तीं तिघे पुनः वाटचाल करूं लागलीं.

थोड्या वेळानें एक गांव लागलें. ते सबध गांव भीतिग्रस्त मनानें जागेच होते. काहीं मडळींचे पडाव धर्मशाळा आणि चावडीवर पडले होते. कुठेंहि पाय ठेवायला काहीं जागा नव्हती. शेवटीं गावाबाहेरील एका झाडाखालीं जगन्नाथानें एक घोंगडी अंथरून त्यावर तीं तिघे कशीं-बशीं पहुडलीं.

उजाडलें. पुनः धावपळ सुरू झाली. लवंगी रात्रीच्या चालण्यानें अगदीं गळून गेली होती. थकवा तिच्या मुद्रेवर अगदीं स्पष्ट दिसत होता. पण निघणें भाग होतें ! रात्रीच्या धावाधांवींत तिच्या सपाताहि घेणें राहून गेलें होतें.

रेंगाळत ती त्या दोघाच्या मागे कशी तरी ढकलत चालत होती. ऊन्ह चढूं लागलें, तसे तिचे पाय भाजूं लागले. हें माईच्या लक्षात आलें, तेव्हा तिने आपली ओढणी फाडली, आणि तीं चिरगुटें तिच्या पायांस बाधलीं.

एकदोन दिवस पुरेल इतकें अन्न त्यानीं बरोबर घेतलें होतें. दुपारीं एका पायऱ्याच्या विहिरीवर तीं तिघे थाबलीं. सावली होती, पण ती दुसऱ्या पळकऱ्यानीं अडविली होती. शेवटीं काठीवर उपरणे टाकून जगन्नाथानें कशीबशी लवगीपुरती सावली केली. डोळ्यात पाणी आणून ती माईला म्हणाली,

" बहन, तुम्ही ? "

" माझी काळजी करूं नकोस ! "

" ऊन्ह तर तुम्हालाहि लागतें ! "

" मला उन्हाची संवय आहे. "

" तर मग मलाहि सवय करायला हवी ! " लवंगी सावलींतून बाहेर सरूं लागली. तिला आत कोंबीत माई म्हणाली,

" माझी सोनुली ती ! खूप सोसायचें आहे पुढें. एव्हाच अशी उतावीळ होऊ नकोस ! "

जेवणे उरकलीं. थाबण्याइतकी सवड नव्हती. दिल्लीपासून जितकें लाब जातां येईल, तितकें जाणें इष्ट होतें. तीं तिघें भर उन्हातच निघालीं.

पण सायकाळीं मोठ्या मुष्किलीनें सात आठ मैल जागा ओलाडल्यावर जेव्हा तीं एका गावाच्या हद्दींत शिरलीं, तेव्हा लवंगीचे पाय भाजून त्याना फोड येऊ लागले होते !

तिनें पायाचीं फडकीं सोडलीं, आणि ते गोंजारूं लागली. माईनें जेव्हां तें पाहिलें, तेव्हा कळवळून ती हात मानेमागे घेऊन झाडाच्या बुंध्याशीं बसलेल्या जगन्नाथास म्हणाली,

" भैय्या ! तुला उठायला हवें ! "

" कशासाठीं ? "

" थोडें तेल पैदा कर कुठून."

" तेल ! "

" होय. या गांवात मिळाले तर बघ."

" कशाला ? "

" अरे ! पाय बघ काय झाले आहेत पोरीचे ! "

जगन्नाथानें झटकन् उठून पायास हात लावला. लवंगीला तेवढा स्पर्श जाणवून तिने पटकन् पाय मार्गे ओढले.

जगन्नाथाच्या डोळ्यात खळकन् पाणी उभे राहिलें. तो गहिंवरून म्हणाला,

" लवगी ! तुला माझ्यासाठीं फार सोसावें लागत आहे ! मी तुझ्या जीवनात प्रवेशलो नसतो तर ? "

" अहो ! असें काय बोलता हे ! " लवंगी आश्चर्यचकित होऊन म्हणाली,

" होय लवगी !

" माझे दर्शन काहीं तुला सुखकर झाले नाहीं !

" एऱ्हवीं कुण्यातरी देखण्या सरदाराशीं तुझा विवाह झाला असता,

" त्याच्या सगमरवरी महालातील जलाशयाच्या पाळीवर—

" एखाद्या दासीच्या हातच्या विंझण्याने उष्म्याचा ताप कमी करीत–

" कारजाच्या पाण्याचे तुषार अंगावर घेत––

" पीत असलेल्या मधुर सरबताच्या चवीला उणेदुणे म्हणत—

" वाळ्याच्या तट्ट्यातून येणाऱ्या हवेच्या झुळकीला उष्ण म्हणून बोल लावीत––

" असें जीवन व्यतीत करावें अशी कोमल तुझी कान्ति !

" ती माझ्यासारख्या दरिद्री कवीच्या पदरीं पडलीस !

" का केलास हा अपराध ?

" जा ! अजूनहि परत जा !

" नव्हे, मी नेऊन तुला पोंचवितों !

" औरंगजेबाला साग, मीं फसवून तुझ्याशीं लग्न केलें होतें !

" आणि आता तुला पश्चात्ताप झाला आहे !

" कदाचित् औरंगजेब मला सजा देईल—देईलच तो !

" मी ती आनदानें सोशीन !

" कारण-कारण हें तुझे दुःख आता माझ्याच्यानें पाहवत नाहीं ! "

लवंगीला तें सगळें अगदीं असह्य झालें. ती तशीच धडपडत उठली, आणि जगन्नाथाचे तोंड एका हाताने बद करून ती त्याच्या अंगावर कोसळली.

डोळे पुसून माई म्हणाली,

" पुरे रे ! तिला शारीरिक यातना होत आहेत, तेवढ्या पुरे आहेत. त्यांत या शब्दबाणाची भर घालू नकोस आणखी ! "

जगन्नाथानें आणलेले तेल लवंगीच्या पायाना चोळून ते दाबीत माई बराच वेळपर्यंत बसली. त्या करस्पर्शात लवंगीला कधींहि न अनुभवलेल्या मातृसुखाचा आस्वाद चाखायला मिळाला. ती त्याच धुंदींत माईच्या कुशींत डोके खुपसून झोपली.

दुसरे दिवशीं पुनः प्रवास सुरू झाला. जगन्नाथ एका घोड्याकरितां पडेल तो दाम देण्यास तयार झाला. पण पुढें पळालेल्या पळीने होतीं नव्हतीं तीं प्रवाससाधने निकालास लावलीं होतीं.

रोज निरनिराळ्या आपत्तींना तोंड द्यावें लागे. त्या आपत्तींशीं झुंजत हीं तिघे कशीं तरी मथुरेजवळ पोचलीं खरीं, पण तोवर लवंगी अगदीं ओळखू येईनाशी झाली

वस्त्रे फाटून गेलीं. डोळे खोल गेले. गालफडें वर आलीं. चालायची संवय झाल्यामुळे ती चाले, एवढेच. एऱ्हवीं तिचे शरीर केवळ अस्थि-पंजर मात्र राहिले.

माई रोज रात्रीं तिचे पाय दाबी. तीहि माईच्या मांडीवर डोकें ठेवून मुकाट्यानें पडून राही. माईने विनोद केला, कीं ती हसे, पण तें हसणे तेवढेंच.

जगन्नाथ तिच्या चिंतेच्या भारानें खचत चालला. ज्या आवेशानें तीं मथुरेच्या वाटेला लागलीं, तो आवेश मथुरेंत शिरताना काहीं शिल्लक राहिला नाहीं.

....१५१....

सायंकाळीं तीं मथुरेच्या एका देवळांत शिरलीं. लवंगीनें आत पाय टाकला, धडपडत ती देवळाच्या पायऱ्या चढली, आणि खालीं कोसळली !

माईने घाईघाईने तिला सावरलें. पण तिच्या हाताला जणु चटका बसला !

ती ओरडली,

" भैय्या ! "

" काय झाले ? "

" अरे हें बघ काय तें! तापली आहे ही ! "



# .१२.

त्यानंतर जगन्नाथानें करता आला तो एकहि उपाय काहीं करायचा ठेवला नाहीं.

पण त्याचे दुर्दैव त्याच्या अगोदर मथुरेस जाऊन पोंचलें होतें.

दिल्लीच्या एका यात्रेकरूने जगन्नाथाला ओळखलें! यवनीशी विवाह झालेला ब्राह्मण म्हणून तो आपल्या पंड्याजवळ कुजबुजला. पंड्यानें आपलें प्राप्त कर्तव्य ओळखून लगेच ती वार्ता गावभर पसरविली. ज्या देवळात हीं उतरलीं होतीं, त्या देवळाच्या पुजाऱ्याने लगेच वाववाव उड्या मारीत देवळांत जाऊन या तिघाना ओढून बाहेर काढले!

त्याना जागा मिळाली एका दरिद्री कुम्भाराच्या ओटीवर.

जगन्नाथ सगळ्या वैद्यश्रेष्ठाकडे औषधासाठीं हिंडला. पण सगळीं औषधें त्याच्यासाठीं मथुरा सोडून पळालीं! एकहि वैद्य या यवनीपतीला औषध देऊन आपला उदार धर्म बाटविण्यास तयार झाला नाहीं!

लवंगीचा ताप उतरलाच नाहीं. माई सारखी उशापायथ्याशीं बसून होती. लवगी कधीं तापाच्या ग्लानीनें शुद्ध हारपून कण्हत पडून राही, तर कधीं शुद्धीवर आल्यावर माईशीं कुजगुजत बसे.

आशासक्त जगन्नाथ पुनः एकदा वैद्याकडे जाऊन आला. लवंगीच्या उशाशीं तो दोन्ही हातांनीं तोंड झाकून बसून राहिला. माई लवगीसाठीं पेज करण्याच्या खटपटीस लागली.

लवंगीनें डोळे उघडून जगन्नाथाकडे पाहिलें. त्याचा उदास भाव पाहून तिच्या मुद्रेवर मावळतें स्मित उमटलें. ती त्याचा हात आपल्या क्षीण हातानीं धरून म्हणाली,

" अहो ! "

" काय ? "

" तुम्ही रडताय् ? "

" छे ! "

" हो ! रडताय् ! हंसा बघूं ! "

" नाहीं लवंगी ! हंसूं येत नाहीं माझ्याजवळ ! "

" का ? "

" मीं तुला फसविलें ! "

" कसें ? "

" माझ्याशीं लग्न केल्यानेंच तुझ्यावर या आपत्ती कोसळताहेत ! "

" खोटें ! "

" काय खोटें ? "

" मी अत्यंत सुखात आहे ! "

" सुखात आहेस ? "

" हो ! "

" काहींतरीच ! "

" का ? तुमच्यासारखा पति कुणाच्या नाशिबात आहे ? माईसारखी नणंद कुणाच्या भाग्यात आहे ? "

तेवढ्यात माई पेज घेऊन आली.

" उठत्येस जरा ? "

" कशाला ? "

" पेज पी ! "

" नको मला. "

" पी ग ! "

" ऊं हूं ! "

" असें काय करत्येस ग पोरी ? कांहीं खाल्लें नाहींस, तर ताकत कशी येईल अंगात ? "

" ताकत नकोच मुळीं मला ! "

" का ग ? "

" अंगात ताकद आली, तर मग—"

" मग काय ? "

" तुमच्याकडून सेवा कशी करून घेता येईल ? "

" पोरी ! "

" होय बहन ! तुमच्यासारखी गंगेएवढी पवित्र बाई पाय चेपत्ये, डाक दाबत्ये, दात घांसून देत्ये, अंगातलें बदलत्ये—"

" तूं चूप रहा पाहू ! पेज पी अगोदर ! "

" न प्यायलें तर ? "

" तर मी निघून जाईन ! "

हंसून लवंगी म्हणाली,

" तुमच्याने जाववायचें नाहीं बहन ! हाक मारताच धावत याल ! "

" बरे बरे ! पेज पी ! "

" पित्यें ! "

पेज पिऊन पुनः लवंगी बोलूं लागली. चुप रहा म्हटल्यानें कांहीं ती चुप रहायची नाहीं. डोळ्यात पाणी आणून ती म्हणाली,

" मला बोलू द्या ना बहन ! "

" बरे बाई ! रडूं नकोस."

" हा ! आता छान झाले ! बहन ! "

" काय ? "

" माझी हरणी गाभण आहे. तिला काय होईल ? "

" होईल काहींतरी."

" काहींतरी कसे होईल ? हरिण तरी होईल नाहींतर हरिणी तरी !"

" हरिण होईल."

" हरिण ? ऊंहुं ! हरिणीच होईल ! गोड गोड पिल्लूं ! मोठाले डोळे! मऊ मऊ अंग ! "

थोड्या वेळानें पुनः ती म्हणाली,

" बहन ! "

" काय ? "

" माझ्या देवदाराच्या रोपाला पानें फुटूं लागलीं आहेत. तें मोठें होईल नाहीं ? "

" होय."

" केवढे मोठें ? "

" खूप मोठे ! "

" खूप मोठें म्हणजे कुतुबमीनाराच्या एवढें. तेवढे होईल ना ? "

" होईल ! "

" बहन, माझ्या सशाचा एक डोळा मेल्या माजराने फोडून टाकला ! "

" फोडू दे."

" तुम्ही त्याला मारा हा ! दूध ठेवा समोर ! म्हणजे तें जवळ येईल."

" हो ! "

थकून जाऊन लवंगीला झापड लागे. जगन्नाथ सारखा आसवें गाळीत बसे. माई त्याच्या डोक्यावर हात ठेवून दटावणीच्या स्वरात म्हणे,

" भैय्या ! वेडा का तूं ? "

" सहन होत नाहीं माई हें ! "

" सहन न करून कसे चालेल ! प्रारब्ध भोगायला हवे ना ! "

" पण हें एवढे भयाण प्रारब्ध ? "

" रडून तें चागले होईल का ? "

" पण मला काहींहि करता आले नाहीं ! "

" प्रयत्न केलास ना तूं ? "

" होय माई ! वैद्याच्या हातापाया पडलों ! शेवटीं म्हटलें, तुमच्या औदार्यावर एक उत्कृष्ट काव्य करून देतों तुम्हाला, औषध द्या ! "

" मग ? "

" ते हासले ! गदगदा ! आणि म्हणाले—"
" काय ? "
" ऊंहू ! ते तुला सागण्याजोगें नाहीं ! "
" नको सागूस ! पण रडूं नकोस ! "
" माई ! "
" काय रे ? "
" हिच्या स्मृति जाग्या होताहेत ग ! "
तोंच लवगी जागी होऊन म्हणाली,
" अहो ! "
" काय ? "
" आहात ना इथे ? "
" आहे ना ! "
" मला किनई भीति वाटते ! "
" कसली ? "
" तुम्ही मला सोडून जाल ! "
" नाहीं जायचा ! "
" आणि माई ? "
" मीहि नाहीं जायची ! "

" तुम्ही दोघेहि जाऊं नका हा ! जवळ बसा माझ्या. तुमचे हात इकडे द्या ! छातीवर धरून ठेवत्ये मी. कैद करत्ये तुम्हा दोघाना. म्हणजे पळून नाहीं जायचींत ! "

काहीं क्षण थाबून अत्यंत स्वच्छ शब्दात लवगी म्हणाली,
" अहो ! "
" काय ? "
" मी खराब दिसत्ये अलिकडे ? "
" नाहीं."
" माझे गाल बसले आहेत का ? "
" नाहीं."

" मग तुम्ही माझे चुंबन का घेत नाहीं ? "

जगन्नाथानें आसवें पुशीत मान खालीं घातली.

" तुम्हाला आठवते ? "

" काय ! "

" काश्मीरमध्यें तुम्ही प्रवालवृक्षावर बसला होतात ! "

" हो ! "

" मला वर घेतल्यावर तुम्ही माझें—बहन, लाजू नकोस ! उठून जाशील नाहींतर ! "

" नाहीं जायची ! "

" तुझ्याजवळ काय लाजायचें आहे ? तुला आमचें सगळें माहीत आहे. प्रणय, शृंगार, आलिंगने–माहीत आहे ना ? "

" हो ! "

जगन्नाथाकडे वळून ती म्हणाली,

" घ्या ना हो चुंबन ! "

माईने जगन्नाथाचें तोंड लवगीच्या मुखावर टेकविले.

लवगी तृप्त होऊन म्हणाली,

" आहा ! तुम्ही एकदा म्हणाला होतांत, स्त्रियाच्या अधरात अमृत असतें ! खोटें तें, अमृत तुमच्या अधरात आहे ! थंड ! बर्फासारखें ! "

ती स्वस्थ पडून राहिली. थोड्या वेळाने ती पुनः म्हणाली,

" अहो ! "

" काय ? "

" तुम्ही आग्र्याला गेला होतात ? "

" नाहीं ! "

" चला, आपण आत्तां जाऊं या. "

" हो. "

" अहा ! आग्र्याला जाऊं ! तिथें अब्बाजान आहेत ! तुम्हीं ताज पाहिला आहे ? "

" नाहीं. "

" आपण पाहू या बरें का ! चादण्या रात्रीं. त्या पाढऱ्या स्वच्छ सौंदर्याच्या समोर उभीं राहू आपण दोघें ! हातात हात घालून ! "

एकदम ती माईकडे वळून म्हणाली,

" बहन ! "

" काय ? "

" तुम्ही माझ्या केसात बोटे का फिरवीत नाहीं ? फिरवा ना ! मला बरे वाटतें."

" किनई बाळ ! त्याचा गुता झाला आहे ! "

" मग विंचरा ते ! मी उठून बसत्यें. छानदार वेणी घाला माझी. पहिल्या रात्रीं घातली होतीत तशी. घाला ना ! "

" घालत्यें ! "

" हा ! वेणी घाला. आपल्या बागेंत कुंद बहरला आहे. त्याचीं फुले तोडून आणा. उठा ना ! "

" उठत्ये."

" अर्ध्या फुलाची वेणी करा. अर्धी तशींच ठेवा. तुम्ही माझें ऐकत का नाही ? "

" ऐकत्यें कीं ! "

" नाहीं ऐकत ! अहो, ऐकलेत का ? "

" काय ? "

" बहनला तिचा पगार देऊन काढून टाका आजपासून ! "

" काढीन ! "

" आत्ता काढा ! उठा ! "

माई उठू लागली. हें पाहून लवंगी किंचाळली,

" बहन ! "

" काय ? "

" रागावलात तुम्ही ? मला सोडून चाललात ? जाऊं नका हो ! मला किनई आई नव्हती ! नव्हतीच मुळीं ती ! तुम्ही माझी आई आहात ! आहात ना ? "

" होय ! "

" अहो ! इकडे या ! माई, नव्हे, आई ग ! माझें डोकें आपल्या मांडीवर घे ! अहो, पुनः एकदा म्हणा ! "

" काय ? "

" म्हणा, कीं तूं मला फार आवडत्येस ! या स्थितींतहि ! "

" होय ! " जगन्नाथ रुद्ध कण्ठाने म्हणाला, " तू मला फार फार आवडत्येस ! या स्थितींतहि ! "

" अहा ! एका स्त्रीला मिळवायचें असतें, तें सर्व मला मिळाले आहे ! मी तृप्त आहें ! आता पुढील जन्मीं– "

लवंगीनें डोळे मिटले. माई रडत म्हणाली,

" भैय्या ! गंगाजल आण ! "

जगन्नाथानें धावत माईच्या सब्रळींतील गंगाजलाची कुपी आणली. ती कशीबशी तोंडात ओततात न ओततात, तों संपलें सगळे !

जगन्नाथानें लवंगीच्या प्रेतावर पालथें पडून हृदयकपाट भेदून टाकणारा डा फोडला.

आर्तस्वरात तो म्हणाला,

" लवंगी ! अर्ध्या वाटेतच सोडलेस मला ?

" काहीं क्षणापर्यंत तू माझ्याशीं बोलत होतीस !

" माझ्यासारखा पति मिळाला हे भाग्य, असे तुझ्या मुखींचे शब्द–

" अजून पुरते आकाशात विरले नाहींत तों–

" एकदम मौन धारण केलेस—

" कधींहि न संपणारे–

" ज्याला मर्यादा नाहीं, पार नाहीं, सीमा नाहीं–

दयितस्य गुणाननुस्मरन्ती
शयने सम्प्रति या विलोकितासीत्
अधुना खलु हन्त सा कृशाङ्गी
गिरमङ्गीकुरुते न भाषितापि ॥

" प्रियदर्शनी ! एकदा माझ्याकडे पहा ग !
" आपल्या निळ्या कमळाला लाजविणाऱ्या नेत्रांनीं–
" एकदाच–केवळ एकदाच !
" नाहींस पाहणार ?
" साधकाचें ध्येय जे निर्वाण–
" तें हातीं लागताच–
" मजविषयीं अपरंपार स्नेहाने भरलेले–
" तुझें अन्तःकरण–
" काय रितें झालें ? "

निर्वाणमङ्गलपदं त्वरया विशन्त्या
मुक्ता दयावति दयापि किल त्वयासौ
यन्मा न भामिनि निभालयसि प्रभात–
नीलारविन्दमदभाङ्गिमदैः कटाक्षैः ॥

माई त्याला हृदयाशीं धरून म्हणाली,

" भैय्या ! अरे हृदय फुटते रे माझे ! तुझा हा करुण विलाप ऐकण्याचें सामर्थ्य कुठून आणू मी ? "

जगन्नाथ हुदके देत म्हणाला,

" माई,
" आपल्या मन्दस्मिताच्या अमृतानें–
" मला स्नान घालून–
" प्रफुल्ल नेत्रकमलानीं–
" जी अहर्निश माझी पूजा करीत होती–
" ती नित्यमङ्गलमयी–
" माझ्या गृहातली देवता–
" कामेश्वरी—
" माझ्या हृदयाचा प्रान्त व्यापून राहिली आहे ! "

मन्दस्मितेन सुधया परिषिंच्य या मां
नेत्रोत्पलैर्विकसितैरनिशं समीजे
सा नित्यमङ्गलमयी गृहदेवता मे
कामेश्वरी हृदयतो दयिता न याति ॥

लवंगीच्या प्रेताच्या कपाळावर आपले ओंठ टेकवून माई उठली, आणि घरवाल्या कुंभारास घेऊन आली.

" भैय्या ! ऊठ ! "

" कशाला ? "

" धरून ठेवल्यानें पोर कांहीं परत यायची नाहीं आता. तिची व्यवस्था लावायला नको ? "

कुंभाराकडे वळून ती म्हणाली,

" बाबा ! तुला कदाचित् ठाऊक नसेल. आता आपण जिचा अन्त्य-संस्कार करणार आहोत, ती पातशहा शहाजहॉंची मानसकन्या होती ! "

" काय ? " आश्चर्यानें स्तभित होऊन कुंभाराने विचारले.

" होय. कदाचित् आग्र्याच्या ताजमहालशेजारीं एका भव्य कबरींत हिनें चिरनिद्रा घेतली असती. पण आता ती जिथे जाळली जाईल, तें ठिकाण कोणालाच माहीत असणार नाहीं ! "

कुम्भार आणि माई दोघानीं प्रेत उचलून दहनभूमींत नेलें. जगन्नाथानें अग्नि दिला. मजा पाहण्यासाठीं एकत्र झालेले लोक म्हणाले,

" यवनीची हीच गत व्हायची ! भाग्य समजा, कीं आम्हीं आमच्या स्मशानात प्रेत जाळू दिलें ! "

तिसरे दिवशीं अस्थि गोळा केल्यावर माई म्हणाली,

" भैय्या ! चला आता ! "

" कुठे ? "

" काशीला ! "

" कशाला ! "

✓ " तिथेंच गेले पाहिजे भैय्या ! जगानें धिक्कारलेल्या जीवांना भागिरथी दूर लोटीत नाहीं ! "

उदास, हेतुशून्य अशी काशीयात्रा सुरू झाली. दोघेंहि चालायचें म्हणून चालत बोलणे जवळजवळ बंदच झाले. मध्येंच एकदा माई म्हणाली,

" भैय्या ! "

" काय ? "

" अलंकारशास्त्रावरील तुझें प्रेम—"

" तें आता गंधर्वनगर ठरलें आहे ! "

" माझे ऐकशील ! "

" काय ? "

" अलंकारशास्त्रावर एक अद्वितीय ग्रथ लिही."

" आणि ? "

" आणि पूर्ण झाल्यावर तो लवगीच्या स्मृतीला समर्पित कर ! "

जगन्नाथ चालतां चालता एकदम उभा राहिला, आणि मग मंत्रानें भारल्यासारखा बोलूं लागला,

" होय माई !

" प्रपंचाचा पट अचानक दुभंगला—

" माझी मृगलोचना सखी दूर दूर गेली—

" माझ्या पोहोंचेपलीकडे—

" पण मी एक अलौकिक ग्रन्थ रचीन—

" जो अलंकारशास्त्रांतील मेरुदण्ड मानला जाईल—

" ज्याच्या अध्ययनावांचून अलंकारशास्त्राच्या विद्यार्थ्यांचें अध्ययन अपूर्ण राहील—

" आणि मग—

" ज्या माझ्या प्रियतमेच्या नावानें—

" धूळफेंकीचीं वादळे निर्माण करण्यांत—

" या पंडितंमन्याना स्वर्गलाभ झाल्यासारखे हर्षाचे कड आले—

" त्या पडितमन्याना—

" त्या ग्रंथाच्या शेवटीं मीं लिहिलेला—

" लवंगीच्या सद्‌गुणांची स्तुति करणारा श्लोक—

" त्याचें अध्ययन केल्याशिवाय–

" साहित्यशास्त्री ही पदवीच प्राप्त होऊं शकणार नाहीं–

" अशा रीतीनें त्याच्याकडून–

" मी माझ्या प्रियतमेचें श्राद्ध करवीन !"

काशीला पोचल्यावर नगरापासून लाब एका धर्मशाळेंत या दोघानीं मुक्काम केला. माई भिक्षा आणून जगन्नाथाच्या भोजनाची व्यवस्था करी, आणि तो ग्रथरचनेत निमग्न असे. केवळ सायंकाळींच काय तो जगन्नाथ श्रीविश्वेश्वराच्या मन्दिरात दर्शनाला जाऊन येई. त्या पोळलेल्या जीवाला श्रीविश्वेश्वराने शातिलाभ करून दिला जगन्नाथाला ग्रन्थरचनेची समाधि लागली !

भामिनीविलास पूर्ण झाला. जगदाभरण शेवटास गेला. सुधालहरी, अमृतलहरी, करुणालहरी, लक्ष्मीलहरी हीं स्तोत्रें लिहून झालीं. आणि मग जगन्नाथानें अलकारशास्त्रावरील आपला अलौकिक ग्रंथ रसगगाधर लिहिणें सुरू केले.

ग्रंथसगतीच्या तद्रेंत निमग्न असलेला जगन्नाथ श्रीविश्वेश्वराच्या दर्शनास गेला, आणि तो मन्दिरातून बाहेर पडतो, तो राणा जौहरसिंगजी सुप्रसिद्ध आचार्य अप्पय्या दीक्षितांसह बोलत सभामण्डपात उभे होते, त्याच्या दृष्टीस पडला !

" पण्डितजी !" जौहरसिंगजी आश्चर्यानें म्हणाले.

एखाद्या पाषाणमूर्तीप्रमाणें जगन्नाथ उभा राहिला.

" आपण इथे ?" जौहरसिंगजींनीं विचारलें.

" होय !" जगन्नाथाच्या मुखातून उत्तर बाहेर पडलें.

" कोण हे ?" अप्पय्या दीक्षितांनीं पृच्छा केली.

" वा ! आपला याचा परिचय नाहीं ? शहाजहॉच्या यवनी मानसकन्येशीं विवाहबद्ध होऊन जे काश्मीरच्या नंदनवनात तिच्या सहवासाचा आनंद मनसोक्त उपभोगीत होते, ते हे—"

" जगन्नाथ ?"

" होय ! दिल्लीकर पंडिताचा उपमर्द करून मग जे यवनीचा हात धरून दिल्लींतून पळून गेले—

" ते हे पंडितराज जगन्नाथ ' पण्डितजी, यवनी कुठें आहे ? "

ओंठ चावीत उत्तर न देता जगन्नाथ उभा राहिला. त्याची मुद्रा विकृत दिसू लागली.

तोंपर्यंत अपय्या दीक्षिताच्या भोंवतीं काशीस्थ ब्राह्मणाचा मेळा गोळा झाला होता. पण्डे मुठी वळून दात खाऊं लागले होते त्या सगळ्याना मागें करीत अप्पय्या दीक्षित पुढे झाले, आणि म्हणाले,

" जगन्नाथ ! तूं चोरासारखा काशींत येऊन राहिलास– "

" चोरासारखा ' "

" होय ! आणि नित्य नियमाने विश्वेश्वराच्या दर्शनास येऊन काशीस्थ पण्डितानीं मोठ्या परिश्रमानी साभाळलेले इथले पावित्र्य आपल्या ससर्गानें भ्रष्ट करीत होतास ! पण विश्वेश्वर न्यायी आहे ! त्याच्यापुढें पाप लपत नाहीं ! "

" माझ्याशीं कोण बोलत आहे ? " जगन्नाथानें संतापानें थरथरत विचारले.

अप्पय्या दीक्षितानीं मागे वळून पाहिलें. त्याचा एक विद्यार्थी पुढें येऊन प्रौढीनें म्हणाला,

" अहकारी पापिष्ठा ! साहित्याचार्य अप्पय्या दीक्षित तुझ्यासमोर उभे आहेत ! "

" काय ? अप्पय्या दीक्षित ? चित्रमीमांसेचा कर्ता अप्पय्या दीक्षित ? ज्यानें तो ग्रंथ लिहून साहित्यशास्त्राला अवकळा आणली, तो अप्पय्या दीक्षित ? "

" चूप ! नाहींतर विश्वेश्वराचे देऊळ रक्तानें रगून निघेल ! यवनी-जाराच्या रक्तानें"—दीक्षिताचे विद्यार्थी दातओठ खात पुढें सरसावून म्हणाले.

" थाबा. " दीक्षितानीं त्याना आवरीत म्हटलें, "जगन्नाथा, तुझ्याशीं अधिक बोलण्याची माझी इच्छा नाहीं, कारण तशी तुझी योग्यता नाहीं ! "

" योग्यता ? अरे योग्यता ठरविणार तुम्ही कोण ? आपल्या अहंकाराचा बुडबुडा फुगवून त्याच्या आश्रयानें स्वर्ग जवळ करूं इच्छिणारे क्षुद्र जंतु !

" योग्यता ठरवील महाकाल !

" जो या सगळ्या कळसूत्री बाहुल्याचीं सूत्रें हातीं वागवून सहज लीलया त्याना नाचवीत आहे—

" तो योग्यता ठरवील—

" आणि—

" या बाहुल्यापैकीं जगन्नाथ हें नाव धारण केलेली बाहुली प्रेमानें उचलून घेऊन तो—

" कदाचित् या सगळ्या बाहुल्यांचीं मस्तकें—

" त्या बाहुलीच्या चरणीं नम्र करील ! "

संताप अनावर होऊन दहावीस ब्राह्मणानीं जगन्नाथाशीं लोटालोटी सुरू केली. त्याना कसोशीनें मागे सारीत अप्पय्या दीक्षित म्हणाले,

" जगन्नाथा ! तूं या क्षणीं इथून जा ! काशीचा धर्माधिकारी या नात्यानें मी तुला आज्ञा करीत आहें ! "

" काय ? "

" तूं पुनः विश्वनाथाचें मंदिर आपल्या संसर्गानें विटाळता कामा नयेस ! जा ! "

जगन्नाथ विकल होऊन म्हणाला,

" अरे ! सगळ्या विश्वाचा नाथ–त्याचें द्वार तुम्ही मला बंद करतां ?"

उत्तर दिले उद्दाम ब्राह्मणाच्या तडाख्यानीं.

मारीत, लोटीत त्यानीं जगन्नाथाला काशीच्या बोळांतून पुढें चालविलें! केशानें मारावें, याचाहि कांहीं विधिनिषेध पाळला नाहीं त्या विप्रश्रेष्ठानीं!

पादत्राणे, दगड, काठ्या हें सर्व सहन करीत जगन्नाथ म्हणत होता,

✓" विश्वनाथा ! तूंहि जगन्नाथाला आश्रय देऊं शकला नाहींस ! "



# १३.

मध्यरात्रीं माई जागी झाली, तों तिला दिवा ढणढण जळत असलेला दिसला. उद्‌भ्रात जगन्नाथ भेसूर मुद्रेने पानामागून पानें लिहीत चालला होता.

" भैय्या ! " माईने हाकारले. उत्तर नाहीं. माई उठून जगन्नाथा-जवळ गेली आणि म्हणाली,

" भैय्या ! काय लिहीत आहेस हे ? "

विकट हसूं हंसून जगन्नाथ म्हणाला,

" चित्रमीमासाखडण ! "

" चित्रमीमासाखंडण ? "

" होय ! अप्पय्या दीक्षिताने साहित्याच्या प्रातात जी घाण करून ठेवली, ती काढीत आहे ! "

" नको भैय्या ! ऐक माझे ! " काकुळतीनें माई म्हणाली.

" काय ? "

" लोकाच्चीं धुणीं धूत बसण्यापेक्षा तुझा रसगंगाधर पूर्ण कर ! "

" जगन्नाथाच्या जीवनात काय पूर्ण झालें आहे माई ?

" त्याचे सगळेच अपूर्ण !

" माझी दुर्गाम्बा—

" तिला म्हटलें होते, उत्तरेंतून कीर्तिसंभार घेऊन येऊन तो तुझ्या लेंकराला खेळायला देईन—!

" आता काय देऊं तिला ?
" काल खाल्लेल्या शिव्या ?
" दगड ?
" पादत्राणे ?
" ती कामना मध्येच खण्डित होऊन तिचे अणुरेणु—
" आकाशात उडून गेले आहेत—
" लोकक्षोभाच्या वादळाबरोबर.
" त्यानंतर जीवनात प्रवेशली लवंगी—
" नाना मधुर संकल्पाचे वायन सवे घेऊन—
" विशुद्ध प्रेमाचीं वस्त्रे लेऊन—
" मधुभाषिणी—
" गजगामिनी—
" प्रियदर्शिनी—
" पण—
" वास्तवानें—
" भेसूर, विक्राळ हंसूं हंसत—
" तेंहि चित्र अर्धवट रंगलेल्या स्थितींत फाडून टाकले !
" तिथून आलों होतो—
" विश्वनाथाच्या पायाजवळ—
" तो सगळ्या विश्वाचा नाथ—
" पीडिताचे विश्रामस्थान—
" आर्तांचा सखा—
" तो तरी मला आपल्या चरणापासून दूर लोटणार नाहीं—
" या कामनेनें—
" पण—
" काल जगन्नाथाला त्यानेंहि हात धरून उठवून दिले !
" तोहि आश्रय देऊ शकला नाहीं त्याला !
" रसगंगाधर अपूर्ण राहिला ?

" राहूं दे !

" आता—

" जगन्नाथ निर्विषय झाला आहे !

" कांहींहि घडविण्याचे सामर्थ्य असलेली सृजनशक्ति विमुख झाली आहे !

" राहिलें आहे एकच--

" लवगीचे स्मरण--

सर्वेऽपि विस्मृतिपथं विषयाः प्रयाताः
विद्यापि खेदगलिता विमुखीबभूव
अद्यापि सा हरिणशावकलोचना मे
नैवापयाति हृदयादाधिदेवतेव ॥

" पण अजून संहाराचें सामर्थ्य अंगीं असल्याचा भास होतो आहे, तोंवर--

" महामहोपाध्याय अप्पय्या दीक्षिताच्या तोंडाला काळे फासून घेऊं दे ! "

जगन्नाथ वेड्यासारखा मोठमोठ्यानें हसत सुटला !

" भैय्या ! तूं ऐकणार आहेस कीं नाहीं माझे ? "

" काय ? "

" आता झोंप पाहूं ! "

" झोप येणार नाहीं माई ! "

" येईल ! "

" एक करशील ?

" लहानपणीं दुर्गाम्बा माझ्याजवळ झोपून मला म्हणे, दादा, मला थोपट ! आता मी तुला म्हणतो, माई मला थोपट ! थोपटशील ? "

डोळ्यातलें पाणी पुशीत माई म्हणाली,

" होय ! "

जगन्नाथ आडवा झाला. माई त्याला थोपटीत राहिली.

" माई ! "

" काय ? "

" एक गाणें म्हण ना ! "

" म्हणत्ये ! "

अत्यंत मृदु स्वरात माईने गाणें सुरू केले.

सो जा मेरे बचपन सो जा
विस्मृतिके नव अचल में ॥

थोड्या वेळानें जगन्नाथास झोंप लागल्याचा भास झाला. म्हणून माई अलगतपणे उठून त्याच्या पायथ्याशीं आडवी झाली. काहीं वेळानें जगन्नाथ तटकन् जागा झाला.

उठून तो बाहेर आला. पहाट झाली होती.

शुक्र अस्तास चालला होता.

जगन्नाथ कावराबावरा होऊन त्याला म्हणाला,

" एकटाच चाललास ?

" थाब !

" मीहि येत आहें ! "

जगन्नाथ वेड्यासारखा निघाला. रोजच्या परिपाठाप्रमाणें तो दशाश्वमेध घाटावर जाऊन पोंचला. उन्हाळी पुरास आज भरते चढले होतें. गंगेचें पाणी उसळ्या घेत, खळाळत वर चढत होते.

जगन्नाथाने ते पाहिले. अत्यानंदित होऊन तो म्हणाला,

" अहा !

" आई माझ्याजवळ येत आहे !

" ये आई !

" सगळ्यानी टाकलेला जगन्नाथ तुझ्या आश्रयास आला आहे !

" आजपर्यंत—

" लाबच्या लाब, कंटाळवाणीं वर्षें—

" द्रव्यरूप मदिरेचे पान करून उन्मत्त झालेल्या नृपाचीं—

" स्तुतिस्तोत्रे गाण्यात गेलीं—

" तूं दुरावलीस !

" पण म्हणून मला जडमतीला दूर लोटणें, हा कांहीं तुझा स्वभाव नव्हे, कारण—

" तूं आई आहेस !

पुरो धावं धावं द्रविणमदिराघूर्णितदृशां
महीपाना नाना तरुणतरखेदस्य नियतम्
ममैवाऽयं मन्तु' स्वहितशतहन्तुर्जडधियो
वियोगस्ते मातर्यदिह करुणातः क्षणमपि ॥

" माते ! हा तुझा कुपुत्र अनाथ झाला आहे—
" तू स्नेहार्नें परिपूर्ण आहेस !
" याला इहपरलोकीं गति उरली नाहीं—
" तूं स्वतःच सद्गतिरूपा आहेस !
" हा महापापी आहे—
" तूं विश्वाच्या उद्धाराचे कंकण ल्याली आहेस !
" हा भवरोगग्रस्त आहे—
" तूं सिद्ध औषधि आहेस !
" हा युगायुगाचा तहानेला आहे—
" तूं अमृतमयी आहेस !
" तेव्हा तूं या कुपुत्राला दूर लोटूं नकोस !

अनाथः स्नेहार्द्रां विगलितगतिः पुण्यगतिदा
पतन् विश्वोद्धर्त्रीं गदविगलितः सिद्धभिषजम्
सुधासिन्धु तृष्णाकुलितहृदयो मातरमयं
शिशुः संप्राप्तस्त्वामहमिहविदध्याः समुचितम् ॥

" आई !
" आतां माझ्या शुभाशुभाची चिंता तुला !
" त्वदेकशरण झालेल्या या तुझ्या लेकराला—
" अशा कसोटीच्या वेळीं—

“ जेव्हा सगळ्या विश्वाचे शुभशकुन--
“ त्याच्यासाठीं अपशकुन झाले आहेत--
“ तेव्हा--
“ जर तूं आपल्या कुशींत--
“ ठाव देणार नाहींस—
“ तर—
“ गगा त्रिभुवनाला अभय देणारी आहे —
“ असा तुझ्याविषयीं प्रचलित असलेला विश्वास अस्तंगत होईल ना !
“ आणि—
“ तुझी अकृत्रिम करुणा—
“ विफल होईल ना !

सदैव त्वय्येवार्पितकुशलचिन्ताभरमिम
यदि त्वं मामंब त्यजसि समयेऽस्मिन् सुविषये
तदा विश्वासोऽय त्रिभुवनतलादस्तमयते
निराधारा चेयं भवति खलु निर्व्याजकरुणा ॥

“ तेव्हा ये आई !
“ अशीच वर ये !
“ आपला पदर खोंचून घे !
“ मस्तकीं शोभत असलेलें हे चन्द्रबिंब—
“ ते नेटकें सावरून धर !
“ तुझ्या जललहरी सर्पांप्रमाणे—
“ इतस्ततः क्रीडा करीत आहेत,
“ त्याना जरा आवर घाल !
“ आणि—
“ तुझ्याशिवाय ज्याला कुठेंहि आश्रय उरला नाहीं,
“ विश्वनाथानेंहि ज्याला दूर लोटलें—

" अशा जगन्नाथाला आपल्या असीम जलराशींत--

" लहानसे स्थान दे ! "

बधान द्रागेव द्रढिमरमणीयं परिकरं
किरीटे बालेन्दुं नियमय पुनः पन्नगगणैः
न कुर्यास्त्वं हेलामितरजनसाधारणतया
जगन्नाथस्याय सुरधुनि समुद्धारसमयः ॥

गंगेचें जल जगन्नाथ बसला होता, त्या पायरीपर्यंत आलें. तो उठला, एकदा अस्पष्टपणें " लवगी ! " असें पुटपुटला आणि त्यानें गंगेंत उडी घेतली !

" भैय्या ! " त्याचा मागोवा काढीत धावत आलेली माई आर्त स्वरांत ओरडली.

चारसहा बुडबुडे वर आले, आणि एकमेकाभोंवतीं गरगर फिरत प्रवाहाबरोबर वहात गेले.

